


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५२ । अंक १२ । **सप्टेंबर १९९९**
श्रावण-भाद्रपद, शके १९२०
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका








# सर्वसहभागाधिष्ठित भांडवलशाही

**देवदत्त दाभोलकर**

एप्रिल १९९८ च्या *नवभारत*च्या अंकात माझा "लोकशाही समाजवादाच्या दिशेने : 'पुनश्च हरि ओम्' " हा लेख प्रसिद्ध झाला. रॉवर्ट हाइलब्रोनर यांच्या *ट्वेन्टिफर्स्ट सेंच्युरी कॅपिटॅलिझम* (१९९३) या पुस्तकावर आधारित काही चिन्तन असे त्या लेखाचे स्वरूप होते.

या जागतिक समस्येचा नव्या दिशेने शोध घेण्याचा प्रयत्न करणारा दुसरा एक ग्रन्थ अलीकडेच वाचनात आला. *'दि ओनरशिप सोल्यूशन : टोवर्ड अ शेअर्ड कॅपिटॅलिझम फॉर दि ट्वेंटिफर्स्ट सेंच्युरी'* (१९९८) असे त्या ग्रन्थाचे शीर्षक आहे.

जेफ् गेटस् (Jeff Gates) हे या ग्रन्थाचे लेखक आहेत. वकील म्हणून, गुंतवणुकीच्या क्षेत्रातील पतसंस्थाचालक म्हणून, राजकीय सल्लागार म्हणून त्यांनी काम केले आहे. जगात अनेक राष्ट्रांना, उत्पादन संस्थांना, कामगार संघटनांना त्यांचा सल्ला घ्यावा असे वाटत आलेले आहे. आजच्या एकूण गोंधळाच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी कामगारांना त्यांच्या कारखान्यातून भागभांडवलदार करून घेणे आवश्यक आहे असे त्यांचे मुख्य प्रतिपादन आहे. एम्प्लॉयी स्टॉक ओनरशिप प्लॅन (ESOP) असा या संकल्पनेचा निर्देश केला जातो. या कल्पनेंची काही मांडणी त्यांच्या आधीही करण्यात आली होती याचा निर्देश त्यांनी केला आहे. परंतु तपशीलवार मांडणी व व्यावहारिक स्तरावर रचना याचे श्रेय गेटस्ना दिले जाते. या शतकाच्या नवव्या दशकात ते अमेरिकेच्या सीनेटने नियुक्त केलेल्या वित्तसमितीचे मार्गदर्शक होते (१९८०-८७). आपल्या काही कल्पना कायदेमंडळातून पुढे रेटण्यात ते यशस्वी झाले.

ग्रंथाच्या उपसंहाराच्या शेवटच्या परिच्छेदात त्यांनी आपला पूर्ण पत्ता दिला आहे. वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया कळवाव्यात अशी विनंती केली आहे. या 'ना-नफा' चालणाऱ्या प्रयत्नासाठी कोणाला काही अर्थसहाय्य करावयाचे असल्यास त्याविषयीच्या सूचनाही दिल्या आहेत. गेटस् आपल्या संकल्पनेने जवळजवळ एखाद्या प्रेषिताप्रमाणे भारावलेले आहेत असे दिसते. परंतु सर्व मांडणी मात्र त्यांनी वस्तुनिष्ठ निकषांवर करण्याचा प्रयत्न केला आहे.

### गेटस् यांचे प्रास्ताविक

आपल्या प्रास्ताविकात गेटस् यांनी आपण एक नवीन संकल्पना मांडण्याचा प्रयत्न करीत आहोत हे स्पष्ट केले आहे. आपल्या या ग्रन्थाचे स्वरूप त्यांनी जॉन मेनार्ड केन्स यांच्या शब्दांत सांगितले आहे. "परंपरागत विचारसरणींच्या आणि मांडणीच्या पलीकडे जाण्याचा एक प्रयास" ('a struggle of escape from habitual modes of thought and expression') असा केन्सच्या वचनाचा आशय आहे. केन्सनेही तेच केले. कोणताही नवदर्शनकार तेच करत असतो. आपल्या या ग्रंथातून वाचकांना जागतिक वित्तप्रवाह व भांडवलावरील मालकीहक्क याविषयी पुनर्विचार करावा असे वाटेल, अशी गेटस् यांची अपेक्षा आहे.

'इसॉप' (ESOP) हे गेटस् यांच्या मते आजच्या या क्षेत्रातील समस्यांवर उत्तर आहे. गेल्या दशकात सुमारे वीस वेगवेगळ्या राष्ट्रांना आपण या दृष्टीने मार्गदर्शन केले आहे असे गेटस् सांगतात. या राष्ट्रांत वेगवेगळ्या पद्धतीच्या शासनसंस्था असणारी वेगवेगळ्या विचारसरणीची राष्ट्रे आहेत. विशेषतः शासकीय उद्योगांकडून खाजगी उद्योगक्षेत्राकडे वळणाऱ्या राष्ट्रांचा यांत समावेश आहे.

'इसॉप' या संकल्पनेचा जन्म एका दुर्लक्षित छोट्या पुस्तकात झाला, असे गेटस् सांगतात. ते १९५८ मध्ये प्रसिद्ध झाले. त्याचे शीर्षक *दि कॅपिटॅलिस्ट मॅनिफेस्टो* असे होते. तो केल्सो आणि ॲडलर यांनी प्रसिद्ध केला होता. केल्सो हे सॅन्फ्रान्सिस्को मध्ये वकील होते. ॲडलर हे एक तत्त्वज्ञ होते. भागभांडवल काही व्यक्तींच्या हातात केंद्रित असण्यापेक्षा ते अनेक व्यक्तींमध्ये विखुरले गेले पाहिजे आणि ते तसे झाले तरच आर्थिक व सामाजिक समस्यांना उत्तर सापडू शकेल अशी केल्सो व ॲडलर यांची मांडणी होती. आपल्या ग्रंथात आपण या संकल्पनेच्या प्रगतीचे (विचार आणि व्यवहारातील)

अनुक्रमणिका







एक सर्वंकष विहंगम अवलोकन करण्याचा प्रयत्न करीत आहोत, असे गेटस् यांनी आपल्या प्रास्ताविकात सांगितले आहे. हा ग्रन्थ तज्ज्ञांसाठी नाही, सर्वसामान्य वाचकांसाठी आहे; या संकल्पनेचा परिचय अधिकात अधिक लोकांपर्यंत व्हावा व अनेक वेगवेगळ्या प्रकारांनी ही कल्पना राबविता येते याचे भान त्यांना आणून द्यावे हाच आपला या ग्रन्थ-लेखनामागचा हेतू आहे, हेही त्यांनी स्पष्ट केले आहे.

हा हेतू साध्य करण्यात गेटस् पुष्कळच यशस्वी झालेले आहेत हे मान्य केले पाहिजे.

**आजची परिस्थिती?**

'श्रीमंत आणि गरीब यांच्यामधील दरी वाढत आहे' हे आता एक सर्वमान्य व म्हणूनच सर्वसामान्य गुळगुळीत असे विधान झाले आहे. ही दरी गरीब राष्ट्रांतून वाढत आहे तशी प्रगत राष्ट्रांतूनही वाढत आहे. विकसनशील राष्ट्रांत आज श्रीमंत मध्यमवर्ग वाढत आहे ही गोष्ट खरी, परंतु कालान्तराने त्या राष्ट्रांतही तो वर्ग संकुचित होत जाणार आहे, आणि आजही त्या सर्वांवर असुरक्षिततेची छाया पडलेलीच आहे. अनेक लक्ष डॉलर वार्षिक पगार मिळवणाऱ्यांनादेखील उद्या आपली नोकरी राहील की नाही याची शाश्वती नाही. मग तो 'घरी बसायला काय घ्याल?' अशा स्वरूपाचा 'गोल्डन हँडशेक' (भरभरून भरपाईसह निरोप) असो की 'उद्यापासून आपण कामावर येण्याची गरज नाही' ही ऑफिसची वेळ संपताना मिळणारी नोटीस असो. विकसनशील व प्रगत अशा दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांतून आज येणारा हा अनुभव आहे. तंत्रज्ञान वेगाने पुढे जात आहे. जपानमध्ये दरदिवशी तीनशे मोटारगाड्या तयार करणाऱ्या एका कारखान्यात ६६ अतिकुशल तंत्रज्ञ आहेत व ३१० यंत्रमानव ('रोबो') आहेत. हेच अन्य राष्ट्रांतूनही चालू आहे व चढाओढीच्या रेट्याखाली यापुढेही असेच चालू राहणार आहे.

वार्षिक पगार काही लक्ष रुपये असणे हे भारतातही आता सवयीचे झाले आहे. काहींच्या बाबतीत हा आकडा कोटींमध्येही जातो. परदेशांत बहुराष्ट्रीय कंपन्यांत सर्वोच्च स्थानावर असणाऱ्या व्यक्तींचे वेतन इतर अनेक सुविधांसह कित्येक अब्ज रुपयांपर्यंत जाते.

श्रीमंत आणि गरीब (गरिबीची व्याख्या त्या त्या देशात वेगळी असू शकते) यांच्यामधील दरी जगात सर्व राष्ट्रांत वाढत आहे. अमेरिकेत सर्वांत धनाढ्य कुटुंबांची संख्या एकूण कुटुंबांच्या संख्येच्या एक टक्का होती तरी त्यांचा राष्ट्रीय उत्पन्नाचा वाटा १९७९ ते १९८९ या दशकात २० टक्क्यांवरून ३६ टक्क्यांपर्यंत वर गेला. अमेरिकेतील वरच्या एक टक्का लोकांच्या हातात असलेली संपत्ती खालच्या नव्वद टक्के लोकांच्या हातात असलेल्या संपत्तीपेक्षाही अधिक आहे. अमेरिकेत दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस ही दरी जेवढी होती त्याहून आज ती कितीतरी अधिक मोठी आहे. १९९६ मध्ये अमेरिकेतील सर्वांत वरच्या स्तरातील २० टक्के लोकांच्या हाती राष्ट्रीय उत्पन्नाचा ४८.२ इतका भाग जात होता तर सर्वांत खालच्या वीस टक्के लोकांना त्यातील केवळ ३.६ टक्के भाग मिळत होता.

ही अमेरिकेतील स्थिती झाली. जागतिक स्तरावर तर हे दारिद्र्य आणि ही विषमता अधिकच विदारक स्वरूपात अस्तित्वात आहे. संयुक्त राष्ट्रसंघाच्या १९९६ च्या आकडेवारी-प्रमाणे जगातील शंभर राष्ट्रांचे उत्पन्न १९८० नंतर घसरले होते. जगातील शेवटच्या २० टक्क्यांतील लोकांच्या हाती येणारा जागतिक उत्पन्नाचा भाग गेल्या तीस वर्षांत २.३ टक्क्यांवरून १.४ टक्क्यापर्यंत खाली आला. जगाच्या पाचशे-सत्तर कोटी लोकसंख्येपैकी वरच्या वीस टक्के लोकांच्या हातात जगातील ८३ टक्के संपत्ती एकवटली आहे. १९७० ते १९८५ या कालखंडात जागतिक उत्पन्न चाळीस टक्क्यांनी वाढले; परंतु दरिद्री लोकांची संख्याही सतरा टक्क्यांनी वाढली. आफ्रिकेतील व दक्षिण अमेरिकेतील अनेक राष्ट्रांतून दर डोई उत्पन्न गेल्या दहा वर्षांत घटले आहे. प्रगत राष्ट्रांतही दहा कोटी लोक त्या त्या देशातील दारिद्र्यरेषेखाली जगत आहेत व त्यातील पाच कोटी लोकांना राहावयास घरे नाहीत. १९९६ मध्ये जगात केवळ ३५८ असे कोटी-कोट्यधीश होते की त्यांची संपत्ती जगातील पंचेचाळीस टक्के लोक ज्या राष्ट्रांत राहतात त्या राष्ट्रांच्या एकत्रित उत्पन्नापेक्षा अधिक होती.

मर्यादित संख्येच्या लोकांच्या संदर्भात विपुल समृद्धी व असंख्य लोकांसाठी दारिद्र्य हे दृश्य राष्ट्रांतर्गत दिसून येते त्याचप्रमाणे जगातील विविध राष्ट्राराष्ट्रांच्या संदर्भातही आढळून येते. ज्या समृद्ध राष्ट्रांत जगातील वीस टक्केच लोकसंख्या राहते त्या राष्ट्रांच्याकडे जागतिक उत्पन्नाचा पंच्याऐंशी टक्के भाग जातो. तीस वर्षांपूर्वी हेच प्रमाण सत्तर टक्के होते. तीस

वर्षांपूर्वी समृद्ध राष्ट्रांतील लोकांचे जीवनमान दरिद्री देशांतील लोकांच्या जीवनमानापेक्षा तीसपट वर होते. आज तेच प्रमाण जवळजवळ साठपट झाले आहे. "अशी विषमता निरन्तर टिकवून ठेवणारा विकास हा चिरंजीवी होऊ शकत नाही, इतकेच नव्हे तो चिरंजीवी करण्याच्या लायकीचाच नाही" असे राष्ट्रसंघाच्या तज्ज्ञ समितीने म्हटले आवे. ("Development that perpetuates today's inequalities is neither sustainable nor worth sustaining.") गेटस् यांनी हे उद्धृत करताना (पृ. ७) 'तो चिरंजीवी करण्याच्या लायकीचाच नाही' हा उत्तरार्ध अधोरेखित केला आहे.

**अंगभूत समस्या**

भांडवलशाहीची ही अंगभूत समस्या आहे याचे भान अर्थशास्त्रातील तत्त्वचिंतकांना प्रथमपासून आहे. ॲडॅम स्मिथ हा अर्थशास्त्राचा जनक समजला जातो. त्यामुळे त्या आधीच्या तत्त्वचिंतकांचा विचार करावयास नको. भांडवलशाहीच्या प्रारंभीच्या काळातही, काही लोक गवर होत आहेत, परंतु वहुसंख्य मात्र भरडले जात आहेत ही कोणाही सहृदय माणसाला जाणवणारी वस्तुस्थिती अस्तित्वात होतीच. त्याच कालखंडाचे वर्णन तत्कालीन कवी गोल्डस्मिथने 'रचले इमले पिचले मानव' ('Where Wealth accumulates and Men decay') अशा शव्दांत केले होते.

सजग विचारवंतांना ही समस्या जाणवत होती. आपापल्या परीने त्यांनी ती सोडविण्याचा प्रयत्नही केला, परंतु त्यांचे प्रतिपादन अधूरे राहिले असे गेटस् यांचे प्रतिपादन आहे. ॲडम स्मिथ, मार्क्स व केन्स यांच्या मनाच्या गाभाऱ्यातही याच स्वरूपाचे विचार होते असे सांगण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे.

ॲडॅम स्मिथविषयी लिहिताना तर अमर्त्य सेन यांच्या १९८७ मधील विधानाचाही उपयोग केला आहे. (पृ. ३२८, टीप २६) एरवी कोठेही त्यांनी कोणा भारतीय विचारवंताचा निर्देश केलेला नाही. भारताचा निर्देशही प्रत्यक्ष असा एकदाच व तोही भारत-पाकिस्तानमधील लष्करी स्पर्धेच्या संदर्भात आला आहे. (पृ. ९२) (हे थोडेसे खटकते. गांधीजींच्या विश्वस्तवृत्ती – 'ट्रस्टीशिप' – या संकल्पनेचे निदान काही स्मरण त्यांना व्हावयास हवे होते असे वाटून जाते.)

**ॲडॅम स्मिथ**

अर्थशास्त्राचा जनक ही पदवी ॲडॅम स्मिथला मिळवून देणारा त्याचा ग्रंथ 'राष्ट्रांची संपत्ती' (*द वेल्थ ऑफ नेशन्स*)हा १७७६ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यापूर्वीच १७५९ मध्ये त्याने आपला 'नैतिक भावनांची मीमांसा' (*द थिअरी ऑफ मॉरल सेंटिमेंट्स्*) हा ग्रंथ प्रसिद्ध केला होता. त्या ग्रंथात त्याने मानवांची परस्परांविपयींची सहानुभूती ही नैतिकतेचा मूलाधार आहे, असे प्रतिपादिले आहे.

प्रत्येकाला आपले हित समजते व प्रत्येकाने त्या दिशेने प्रयत्न केला म्हणजे समाजाच्या एकूण हितातही भरच पडते म्हणून आर्थिक व्यवहारात शासनाने हस्तक्षेप करू नये अशी ॲडॅम स्मिथची मांडणी होती. आपले हित सांभाळत असताना एक दुसऱ्याच्या हितसंवंधांवर घाला घालणार नाही, हे त्याचे गृहीतकृत्य होते. राक्षसी अंधस्वार्थ त्याला अभिप्रेत नव्हता. तसा स्वार्थ असणे हे त्याच्या नैतिकतेच्या संकल्पनेच्या विरोधी होते.

भांडवलशाहीच्या विकासक्रमाने त्याच्या या अपेक्षा चूक ठरवल्या. मूठभर भांडवलदारांच्या हातात आर्थिक सत्ता केंद्रित होऊ लागली. हे भांडवलदार पर्यावरण किंवा अन्य कोणत्याही सामाजिक गोष्टीचा विचार न करता नफा वाढविण्याच्या मागे लागले.

जसजसा भांडवलशाहीचा विकास होत गेला तसतसा उत्पादक आणि ग्राहक यांच्यामधील परस्परसंवंध दुरावत चालला. अर्थव्यवस्थेला प्रेरणा देणारा व तिला मार्गावर ठेवणारा (ॲडॅम स्मिथच्या संकल्पनेतील) 'अदृश्य हात' अधिकाधिक अदृश्य होत चालला. *ॲलिस इन् वँडरलँड*मधील अदृश्य होत होत पूर्णपणे नाहीसे झालेल्या चेशायर मांजराचे छद्मी हास्यच शेवटी मागे उरले त्याप्रमाणे या हाताची स्थिती झाली. भांडवलाच्या हातात सर्व सत्ता गेली आणि या भांडवलाने देखील औद्योगिक भांडवलाच्या पलीकडे जाऊन वित्तभांडवलाची तरलता आणि विरलता प्राप्त करून घेतली. मजुरांवर, पर्यावरणावर, अंतर्गत व आंतरराष्ट्रीय राजकारणावर, ग्राहकांवर आपल्या व्यवहारातून काय विपरित परिणाम घडतील याचा विधिनिपेध वित्तभांडवलाला राहिला नाही. ते परिणाम दूरवरचे होते — स्थलाच्या दृष्टीने व काही वावतीत कालाच्या दृष्टीनेही. नफा कोठूनही कसाही मिळो त्या दिशेने भांडवलाचे प्रवाह खेळते ठेवणे हेच वित्तभांडवलाचे केवळ प्रमुखच नव्हे तर एकमेव

अनुक्रमणिका

उद्दिष्ट अटळपणे झाले. नैतिकतेची वाह्य रंगरंगोटी नफ्याशी जुळत असेल तरच करावी हे वित्तभांडवलाचे धोरण ठरले.

गेटस् यांनी हे सर्व याच शब्दांत व याच पद्धतीने मांडलेले आहे असे नाही; परंतु त्यांचा आशय तसा आहे.

या परिस्थितीतून – तिच्या वाईट परिणामांतून – वाहेर पडण्याचा मार्ग दाखविण्याचा प्रयत्न या ग्रन्थात गेटस् करतात. भांडवल काही जणांच्या हाती केन्द्रित ठेवण्याऐवजी अनेक जणांच्याकडे त्याची मालकी वितरित करणे हा या समस्येतून वाहेर पडण्याचा एक उपाय आहे असे त्यांचे प्रतिपादन आहे. म्हणूनच ग्रन्थाचे शीर्षक 'मालकीहक्काचे वितरण हाच खरा उपाय : एकविसाव्या शतकात वितरित भांडवलशाहीकडे वाटचाल' अशा आशयाचे त्यांनी ठेवले आहे.

समृद्धी आणि सामाजिक न्याय या दुहेरी दृष्टीने विचार करणारे व जगाला आपल्या विचारांनुसार वळण लावणारे मार्क्स व केन्स हे दोघे कृतिशील युगपुरुषही नवसमाज-व्यवस्थेविषयी याच वृत्तीने चिन्तन करत होते; परंतु त्यांच्या विवेचनातील या स्वरूपाच्या चिन्तनाचा भाग प्रकर्षाने पुढे आला नाही या गोष्टीचा गेटस् यांना खेद होतो. हा त्यांचा खेद उचित आहे की नाही हा एक वादाचा विषय होऊ शकेल. हा खेद गेटस् यांना होतो व त्या स्वरूपाचा खेद हे त्यांचे प्रेरणास्थान आहे हे या ठिकाणी महत्त्वाचे आहे.

**चुकलेल्या संधी**

मार्क्स व केन्स यांच्याविषयी लिहिताना गेटस् यांनी 'इतिहासाने अगदी थोडक्यात गमावलेल्या दोन संधी' ('History's two fateful near-misses') असा निर्देश केला आहे. त्यांच्या मते मार्क्सने संपत्तीचे केंद्रीकरण व मजुरांचे शोषण यातून निर्माण होणाऱ्या समस्या दूर करण्याचे तीन सारखेच सयुक्तिक उपाय सुचवले होते. पहिला सर्वांना त्याचा म्हणून मान्य असलेला उपाय म्हणजे खाजगी मालमत्तेचा निरास हा होय. दुसरा उपाय त्याच्या नावाने तितकासा ज्ञात नाही – तो आहे हळूहळू, क्रमाक्रमाने खाजगी मालमत्तेचा हक्क संकुचित करत जाणे हा होय. हा त्याच्या नावे ओळखला जात नसला तरी जगात प्रत्यक्षात अनेक राष्ट्रांतून आचरण्यात आला आहे. 'क्रीपिंग सोशॅलिझम' (हळूहळू रांगत येणारा समाजवाद) म्हणून त्याचा निर्देश केला जातो. भांडवलशाहीला आतून पोखरणाऱ्या दहा प्रक्रिया मार्क्सने सांगितल्या होत्या. त्यांपैकी वालकामगार पद्धतीचा लोप, सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण व चढत्या दराचे आयकर यासारख्या प्रक्रिया तर आता प्रगत भांडवलशाही राष्ट्रांतही दृढमूल झाल्या आहेत असे गेटस् सांगतात.

या दोन उपायांखेरीज एक तिसराही अध्याहृत उपाय मार्क्सच्या मनात होता, असे मॉर्टिमर ॲडलर यांनी आपल्या *हॅव्ज विदाऊट हॅवनॉट्स* या ग्रंथात पृ. ४१ वर दाखविण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी ॲडलर यांनी कम्युनिस्ट मॅनिफेस्टोतील विधानाचा आधार घेतला आहे. लुइ केल्सा यांनीही १९५७ मध्ये 'कार्ल मार्क्स : दि आल्मोस्ट कॅपिलटॅलिस्ट' या शीर्षकाचा निवंध लिहिला होता. गेटस् यांनी मार्क्सला असा आपला सहानुभूतिदार म्हणून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

केन्सनेही आपले आर्थिक मंदीविषयीचे विवेचन मांडताना राष्ट्रातील संपत्तीच्या विभाजनाचा अर्थव्यवहारावर होणारा परिणाम विचारात घेतला होता. परंतु संपत्तीच्या विभाजनाला दीर्घकालीन मुरलेली समाजरचना कारणीभूत असते यामुळे अल्पकालीन विवेचनात ते विभाजन गृहीतकृत्य म्हणून स्वीकारावयास हरकत नाही असे म्हटले आहे इतकेच. गेटस् यांनी केन्सच्या या विधानाकडे आपले लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे.

ॲडॅम स्मिथ, मार्क्स, केन्स यांच्या भूमिकांविषयी अभ्यासकांनी जरूर विचार करावा व आपापली मते वनवावीत अशी गेटस् यांची भूमिका आहे. तरीही, ॲडॅम स्मिथ आजच्या काळात आपले विचार मांडत असता तर त्याने त्यांना (गेटस् यांना) अनुकूल अशीच आपली मांडणी केली असती, अशी पैजही आपण मारावयास तयार आहोत असे, अशा विवेचनात न शोभणारे, आवेशयुक्त विधानही त्यांनी या संदर्भात केले आहे.

परंतु हे समजण्यासारखे आहे. आपल्याला काहीतरी नवीन दर्शन झालेले आहे अशी भावना असणाऱ्या व्यक्तीचा तो उत्साह आहे. त्यांच्या 'प्रास्ताविका'च्या पहिल्या वाक्यातच तो उत्साह त्यांनी प्रकट केला आहे. "एखाद्या वनस्पतिशास्त्रज्ञाला त्याच्या वागेत, आजवर कुणाला आकलन न झालेले काही निसर्गनियम लक्षात आले असताना जसे उद्दीपन होईल तसे मला झाले आहे" असे ते सांगतात.

आपल्याला काही नवे असे काय गवसले आहे असे गेटस्ना वाटते? भांडवलशाहीने भांडवलाचा विकास तर केला परंतु भांडवलदारांची संख्या मात्र घटवली. या परिस्थितीतून

विविध आर्थिक, सामाजिक, राजकीय व सांस्कृतिकही ताणतणाव निर्माण झाले. ही परिस्थिती पालटावयाची असेल तर भांडवलाची मालकी अनेक लोकांकडे गेली पाहिजे, असे त्यांचे प्रतिपादन आहे. हे असे झाले तरच भांडवलशाही उत्पादनात मानवी मूल्यांकडेही लक्ष दिले जाईल, अशी त्यांची धारणा आहे. यासाठी अनुकूल अशी कायदेशीर रचना कशी करता येईल हा त्यांच्या चिंतनाचा व प्रयोगांचा विषय आहे.

गेटस् यांना कोणत्याही एवढा पठडीबद्ध विचारसरणीत बसवणे कठीण आहे. भांडवलशाहीला मानवी चेहरा हवा असे मानणारे ते एक भोळे सद्गृहस्थच आहेत का? का त्यांना व्यक्तिगत स्वातंत्र्य आणि व्यक्तिगत जबाबदारी यांचा आग्रह धरणारे उदारमतवादी म्हणावे? भांडवलशाहीत सुधारणा करणे शक्य व इष्ट आहे असे ते मानतात म्हणून कळत नकळत ते भांडवलशाहीचे हस्तक म्हणूनच काम करीत आहेत असे म्हणावे का? की भांडवलाची मालकी केंद्रित न होता सर्वसामान्यांपर्यंत जाऊन पोहोचावी असा ते आग्रह धरतात म्हणून त्यांना समाजवादी म्हणावे?

गेटस् यांचे असे एखादे निश्चित वर्णन करून त्यांना एखाद्या विचारपठडीच्या बंदिस्त कप्प्यात टाकणे कठीण आहे.

एक सांगता येईल : भौतिक समृद्धी साधत असतानाच मानवाचे मानव म्हणून हित कसे सांभाळले जाईल या यक्षप्रश्नाने व्यथित असणाऱ्या प्रयोगशील विचारवंतांच्या मालिकेत त्यांचे स्थान अवश्यमेव आहे.

हे सांगितल्यानंतर गेटस् प्रत्यक्ष रचना तरी काय सुचवितात याविषयी कुतूहल वाटणे साहजिक आहे. मला अगत्य त्यांच्या मूलभूत भूमिकेविषयीचे आहे, तपशिलाविषयीचे नाही. परंतु निदान काही आराखडा देणे मी महत्त्वाचे आणि उपयोगी मानतो.

**रचना**

दिशादर्शनासाठी सध्याच्या रचनेत भांडवलशाही दोन आधार घेते :

(१) खुल्या बाजारपेठेतील किंमती;

(२) खुल्या शेअर मार्केट (भांडवल बाजार) मधील शेअर्सच्या किंमती.

यांच्या आधारे कंपन्या आपले निर्णय घेत असतात. कंपनीचा व्यवहार प्रत्यक्ष संचालकप्रमुख पाहात असतो. त्याच्या-मागे सर्वसाधारणपणे संचालक मंडळ असते.

भांडवलशाहीच्या विकासक्रमात ग्राहकबाजारात, शेअर-बाजारात आणि व्यवस्थापनातही आपण भांडवलशाहीच्या तात्त्विक रचनेला अभिप्रेत आदर्श रचनेपासून खूपच दूर गेलो आहोत.

याहून महत्त्वाची गोष्ट अशी की, भांडवलधारकांचा (शेअरहोल्डर्स) विचार केला जातो; परंतु हितसंबंधितांचा (स्टेकहोल्डर्स) मुळीच विचार केला जात नाही. मजूर, ग्राहक हे तर हितसंबंधित असतातच; परंतु, उत्पादनप्रक्रियेच्या पर्यावरणीय व अन्य परिणामांमुळे, प्रत्यक्ष काहीच संबंध नसलेल्या इतर लोकांच्यावर जे परिणाम घडतात त्याचे काय? हे हितसंबंधी केवळ याच पिढीतले असतील असेही नाही. विविध प्रदूषणांचे, चुकीच्या निर्णयांचे परिणाम भावी पिढ्यांनाही भोगावे लागतील.

रचनेत पूर्वीचे दोष काढून टाकता येतील का? नवीन आवश्यक गोष्टी अनुस्यूत करून घेता येतील का?

भागधारक (शेअरहोल्डर्स) विरुद्ध हितसंबंधित (स्टेक-होल्डर्स) असा झगडा निर्माण झाला की सध्या एकतर ते वाद न्यायालयात जातात किंवा काही नियंत्रणे आणून मिटवले जातात. गेटस् यांच्या कल्पनेप्रमाणे या दोन्ही गटांत परस्पर-संपर्काची अशी रचना करता यावी की, ज्यामुळे हे संघर्ष निर्माण होण्यापूर्वीच आवश्यक त्या सुधारणा केल्या जातील.

हे प्रत्यक्षात कसे करावे? आपल्या कल्पनेला त्यांनी 'अप-क्लोज कॅपिटॅलिझम' असे नाव दिले आहे. 'निकट भांडवलशाही' असा त्याचा अनुवाद आपण करू. काय करावे? हितसंबंधितांनाही काही भांडवलभाग (शेअर्स) द्यावेत. त्यांचे प्रमाण एकूण भागदारांच्या संख्येत अत्यल्प असले तरी त्यांच्या सहभागाचा व्यवस्थापनावर परिणाम घडू शकेल असे गेटस् यांना वाटते. नोबेल पारितोषिक विजेते अर्थशास्त्रज्ञ मिरॉन शोल्स (Myron Scholes) अशा निकट भांडवलशाहीच्या बाजूचे आहेत. हितसंबंधितांत ते मजूर व ग्राहक यांचाही समावेश करतात. तथाकथित इतर भागधारकांपेक्षा या हितसंबंधित भागधारकांना या उद्योगाची अधिक काळजी असते. दूरच्या भागधारकाने अनेकदा नुसते भाग विकत घेतलेले असतात. अनेकदा ती उत्पादक-संस्था त्याने पाहिलेलीही नसते. 'हितसंबंधित' भागधारकांचा विविध हितसंबंधांच्या स्वरूपात उत्पादक-संस्थेशी प्रत्यही संबंध येत असतो. उत्पादनविषयक निर्णयांचा त्यांच्यावर प्रत्यक्ष परिणाम होत असतो. त्यांना

डावलून मग संचालकांना मनमाने निर्णय घेता येत नाहीत. ही मुक्त उत्पादनव्यवस्थाच असेल परंतु समाजातील सर्व हितसंबंधित तिचे व्यक्तिगतरीत्या प्रत्यक्ष भागधारक असतील. हे व्यवसायाचे राष्ट्रीयीकरण नसेल तर ते सर्वहितसमावेशक समाजीकरण असेल.

लोकशाहीसारखीच ही बहुतांश रचना राहील. लोकशाहीत प्रत्येक मतदाराला आपले मत मांडण्याचा अधिकार असतो आणि मतदानातून तो आपल्या मताचा शासनावर प्रभाव टाकण्याचा प्रयत्न करू शकतो. शासन त्याला किती आणि कसा प्रतिसाद देते हा भाग वेगळा. वेगवेगळ्या देशांत वेगवेगळे संदर्भ या प्रतिसादाला आकार देत असतात. 'हितसंबंधितांची भागधारकशाही' अस्तित्वात आली तर तेथेही अशा स्वरूपाच्या समस्या निर्माण होतीलच. गेटस् यांच्या मते यासाठीच तर मूलभूत कल्पना मान्य केल्यानंतर सतत नवीन प्रयोग, सतत नवीन विचार ही प्रक्रिया चालू ठेवावी लागते. विन्स्टन चर्चिल यांनी लोकशाहीच्या संदर्भात काढलेले उद्गार गेटस् यांनी उद्धृत केले आहेत. चर्चिल म्हणाले होते : "लोकशाही व्यवस्थेत अनेक उणिवा आहेत. परंतु इतर कोणत्याही शासनव्यवस्थेपेक्षा लोकशाहीच्या उणीवा कमी आहे इतकेच".

आपल्या रचनेविषयी गेटस् यांना हेच सुचवावयाचे आहे.

मालकीशी ज्यांचे हितसंबंध गुंतले आहेत त्यांच्याकडे प्रत्यक्ष मालकी कशी जाईल हे पाहा, असे गेटस् यांचे प्रतिपादन आहे. त्यांच्या एका प्रकरणाचे शीर्षकच 'Putting the "Own" Back in Ownership'असे आहे.

सर्व हितसंबंधितांच्या हातात मालकीहक्क वितरित झाला तर अनवस्था प्रसंग ओढवेल अशी भीती काहींच्या मनात होती. सार्वत्रिक मतदानावर आधारित लोकशाहीविषयीही अशाच स्वरूपाचे भय अनेकांच्या मनात होते. दोन्ही ठिकाणच्या भयांना उत्तर सारखेच आहे. कितीही मोठा आणि कर्तृत्ववान नेता असला तरी अनेक लोकांचे अनुभवजन्य शहाणपण हे सर्वांच्या दृष्टीने अधिक फलदायी असते असे ते उत्तर आहे. (मनात येते, अशिक्षित भारतीय जनतेने दिलेले निवडणुकांचे निर्णयही याचे एक गमक मानता येतील का?)

वित्तीय संस्थांच्या, केवळ नफ्यावर अधिष्ठित असलेल्या निर्णयप्रक्रियेच्या मगर-मिठीतून सोडवून अर्थव्यवस्था खऱ्या अर्थाने 'सर्वभूतहितेरता' कशी करता येईल या समस्येचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न गेटस् करीत आहेत. विविध राष्ट्रांतील या संदर्भातील समस्यांचा काही तपशील या ग्रंथात त्यांनी दिला आहे. अशा सुमारे वीस राष्ट्रांतील अनुभव त्यांनी विचारासाठी घेतले आहेत. या विषयात रस असणाऱ्यांनी ते मूळातूनच पाहणे उद्‌बोधक होईल. त्यांच्या विचाराची व संभाव्य उत्तरांची दिशा त्यांच्या काही प्रकरणांच्या शीर्षकांवरूनही लक्षात येण्यासारखी आहे. 'श्रमनैतिकता' ('टुवर्ड्स ए वर्कबल वर्कएथिक'), 'कामगारसंघटनांची पुनर्बांधणी' ('रिइन्व्हेंटिंग लेबर युनियन्स') ही प्रकरणे मजुरांच्या हक्कांचा व जबाबदाऱ्यांचा विचार करतात. 'भावी पिढी आणि भांडवलशाही' ('कॅपिटॅलिझम ॲज इफ अवर चिल्ड्रन मॅटर्ड'), 'साम्यवाद नव्हे केवळ समाज' ('कम्युनिटी विदाऊट द कम्युनिझम') व 'मालकीहक्काचे राजकारण' ('द पॉलिटिक्स ऑफ ओनरशिप') ही प्रकरणे याच समस्येकडे वेगळ्या दृष्टिकोनातून पाहतात. (शीर्षकांचा मी केलेला अनुवाद तितकासा नेमका नाही असा आक्षेप कोणा जाणकाराच्या मनात आल्यास मी त्याच्याशी सहमत आहे एवढेच येथे सांगून ठेवतो. एकूण आशयाचे अनुसंधान राखण्याचा प्रयत्न मी केला आहे.)

'भांडवलशाहीचा पुनःशोध' ('रिइन्व्हेंटिग कॅपिटॅलिझम'), 'समावेशक भांडवलशाहीसाठी' ('रिइंजिनिअरिंग कॅपिटॅलिझम फॉर इन्फ्युजन') आणि 'हवी अधिक भांडवलदार निर्माण करणारी भांडवलशाही' ('क्रिएटिंग ए कॅपिटॅलिझम दॅट क्रिएट्स मोअर कॅपिटॅलिस्ट्स') या प्रकरणांतून गेटस् यांनी सध्याच्या परिस्थितीत असलेल्या उणिवा दाखविलेल्या आहेत व काही उपाय सुचवलेले आहेत. उणिवा सामान्यपणे आपणा सर्वांना माहीत असणाऱ्या अशाच आहेत. तपशिलात अलीकडे-पलीकडे काही फरक असेल तितकाच. आपल्याकडे असणाऱ्या भ्रष्टाचाराच्या व निवडणुकांच्या वेळी घडणाऱ्या अशिष्टाचाराच्या कथा अमेरिकेसारख्या राष्ट्रातही अस्तित्वात आहेत याचेच समाधान मानावयाचे असेल तर ते गेटस् यांच्या याविषयीच्या विवेचनातून आपल्याला घेता येईल.

आज अगदीच अल्पसंख्याकांच्या हातात असलेली भांडवलशाही बहु-बहुसंख्याकांच्या हाती जावी (याला भांडवलशाहीचे लोकीकरण म्हणावे का?) यासाठी गेटस् यांनी तपशिलाने काही उपाय सुचवले आहेत. त्यासाठी करपद्धतीत सुधारणा कराव्या लागतील, गुंतवणुकीचे नियम बदलावे लागतील, परकीय गुंतवणूकदारांना नवीन परिस्थितीशी जुळवून घेणारी कार्यपद्धती स्वीकारावयास भाग पाडावे लागेल, मालकी मिळवणे






शक्य व्हावे या पद्धतीने पतपुरवठा करावा लागेल, यासाठी प्रचार करावा लागेल व मार्गदर्शन केंद्रेही उभी करावी लागतील असे त्यांनी सांगितले आहे. याविषयीच्या अमेरिकेतील काही प्राथमिक अनुभवांचा निर्देशही त्यांनी केला आहे.

सध्याच्या जागतिक भांडवलशाहीच्या काळात या सर्वाला जागतिक संदर्भ अटळपणे राहणार आहे. याचा विचार गेटस् यांनी 'जागतिक भांडवलशाहीच्या आमने सामने' ('कोपिंग वुइथ ग्लोबल कॅपिटॅलिझम') या प्रकरणात केला आहे. आंतरराष्ट्रीय वित्तसंस्था विकसनशील देशांना कर्ज देताना आता पर्यावरणविषयक विचार अटळपणे करतात. तसाच त्यांनी भांडवलाची मालकी नीटपणे वितरित झालेली आहे की नाही याचाही विचार केला पाहिजे, असा त्यांचा आग्रह आहे.

### 'ईसॉप'ची नीतिकथा

ESOP च्या संकल्पनेमागे केवळ अर्थकारण नाही तर नीतिकारणही आहे. संपत्तीच्या कमाल धारणेवर मर्यादा घालण्याचा काळ आता आला आहे अशी मांडणी त्यांनी केली आहे. धर्मांचा व धार्मिक नेत्यांचाही मिळेल तो आधार ते यासाठी शोधतात. कठोर साम्यवाद व अनिर्बंध भांडवलशाही या दोहोंच्या मधला काही मार्ग मानवतेच्या दृष्टीने निघणे आवश्यक आहे असे आवाहन चर्चने वेगवेगळ्या स्वरूपात गेल्या शतकभर केले आहे. १८९१ मध्ये त्यावेळच्या पोपने (तेरावा लुई) मजुरांच्या स्थितीविषयी काळजी व्यक्त करणारे परिपत्रक काढले. त्या परिपत्रकाच्या शताब्दीच्या वेळी पोप दुसरे जॉन पॉल यांनी, साम्यवाद आता पराभूत झालेला आहे असा निर्देश केला, परंतु याचा अर्थ आजची भांडवलशाही अर्थव्यवस्था मानवहिताच्या दृष्टीने यशस्वी झाली आहे असा करणे हे पूर्णपणे चुकीचे ठरेल, असा इशाराही दिला. (पृ. २७१-२७३)

कॅथॉलिक ख्रिश्चन पंथाचे सोडा; गेटस् यांनी इस्लामधर्मीयांकडून काही अपेक्षा बाळगल्या आहेत. जगात ३७ मुसलमानी राष्ट्रे आहेत व मुसलमानांची लोकसंख्या जगाच्या एकूण लोकसंख्येच्या एकपंचमांश आहे, या दृष्टीने त्यांचे लक्ष तिकडे जाणे स्वाभाविक आहे. इस्लामचे समतेचे तत्त्व त्यांना त्यांच्या मांडणीच्या दृष्टीने आशादायक वाटते. ही समता म्हणजे काटेकोर गणिती समता नसून आत्यंतिक विषमतेचा अभाव हाच या समतेचा आशय आहे. परंतु त्यातही श्रीमंतांनी गरिबांविषयीची आपली जबाबदारी पार पाडली पाहिजे अशी अपेक्षा आहे असे गेटस् सांगतात. परंतु, ख्रिश्चन असो वा मुस्लिम असो, भांडवलशाही धर्मविषयक शिकवणुकीवर मात करून विषमतेची पराकोटीची दरी निर्माण करण्यास प्रवृत्त करते, असे गेटस् सांगतात. गेटस् म्हणतात – "प्रवृत्ती तीच. मग तो कतारमधला मुसलमान असो की क्वेबेकमधला ख्रिस्ती असो." (कतार व क्वेबेक ही दोन्ही स्थळांची नावे आहेत.)

अशीच एक दिशा दाखविण्याचा प्रयत्न गांधीजींनी आपल्या विश्वस्तवृत्तीच्या संकल्पनेतून केला. या कल्पनेचा पूर्ण तपशील मांडावयास त्यांना सवड झाली नाही. त्यांच्या कल्पनेशी काही प्रमाणात तरी समरस होणारा एकच भांडवलदार त्यांना भेटला. त्याचे नाव : जमनालाल बजाज. गांधीजींच्या नंतर काही छोट्या उद्योगधंद्यांत काही तुरळक प्रयत्न झाले. यासाठी एखादा कायदा करावा म्हणून आराखडा करण्याचाही प्रयत्न झाला. परंतु ते तेवढ्यावरच थांबले आहे.

विनोबांच्या भूदानयज्ञाने मात्र कृषिक्षेत्रात मालकीच्या परिवर्तनाचा एक मोठाच प्रयोग केला. 'दानं संविभाग:' हे त्यांचे सूत्र मालकीहक्काच्या वितरणाचा मंत्रच होता. काही कायदेही झाले. ग्रामदानेही झाली. सगळ्या जगाचे लक्ष या आंदोलनाने त्या दशकात वेधून घेतले होते.

हे सर्व विरूनही आता दोन दशकांहून अधिक काळ लोटलेला आहे. परंतु गेटस् यांची वृत्ती साक्षेपी अभ्यासकाची आहे. त्यांच्या ज्ञानाच्या व आकलनाच्या क्षेत्रात हे यावयास हवे होते.

ज्ञान कमी पडले की आकलन? की दोन्हीही?

काहीही असो ही एक महत्त्वाची उणीव राहून गेली असे मला आपले वाटते.

याचे एक कारणही आहे.

### गेटस् : प्रयास आणि आशा

गेटस् यांनी आपल्या प्रास्ताविकात हा ग्रन्थ तज्ज्ञांसाठी नाही हे सांगितले होते. तेथेच ते नंतर म्हणतात : "आणि म्हणून मी वित्तविषयक व आर्थिक, वैधानिक जड संज्ञांचा वापर टाळला आहे. माझा ग्रंथ अन्य देशांतही वाचला जावा असे मला वाटते. मी अमेरिकन आहे व त्यामुळे अमेरिकन अनुभवांचा मी खूप वापर केला आहे. परंतु अमेरिका आज अनेक राष्ट्रांचे 'पालकत्व' ('मेंटॉर', अवतरणचिन्ह मुळातील) करीत आहे.

अमेरिकेची बलस्थाने व मर्मस्थानेही या सर्वांना कळली तर ते उपयोगीच होईल. हा ग्रंथ हा या विषयाचा पूर्णविराम नव्हे. 'काम चालू आहे' ही पाटीच येथे आहे. अनेक देशविदेशांतील लोकांनी आजवरच्या वाटचालीत मदत केली आहे. पुढचा रस्ता घडवत घडवतच पुढील वाटचालही करावयाची आहे. अगदी नवी अशी संकल्पना जगात क्वचितच अवतरते. जुन्या संकल्पनांच्याकडेच, पुष्कळदा, नव्या दृष्टिकोणातून पाहण्याचा आपण प्रयत्न करीत असतो. असा काही ताजेपणा या ग्रंथात वाचकांना आढळून येईल अशी मला आशा आहे."

हा ताजेपणा आपल्या मनाला मिळाला की नाही हे ज्याने त्याने आपापल्यापुरते ठरवावयाचे आहे.



## पत्रव्यवहार

### श्रद्धा, अंधश्रद्धा, बुद्धिप्रामाण्यवाद

जून ९९ च्या अंकातील संपादकीयात आपण म्हटले आहे. 'बुद्धीप्रामाण्यवादी' हा शब्द फसवा आहे. अविवेकी माणूसही अविवेकाने वागत असताना, तशा वागण्याचे समर्थन करीत असतांना, बुद्धीचा वापर करतो. 'इंद्रियानुभवप्रामाण्यवादी' (empirical) हा शब्द जास्त योग्य ठरेल." याबाबत मला असं म्हणावंसं वाटतं की, ज्याप्रमाणं अविवेकी माणूसही बुद्धीचा वापर करतो, त्याचप्रमाणं इंद्रियानुभव सुद्धा कधीकधी फसवे असू शकतात! आणि म्हणून याला आणखीनच दुसरा एखादा शब्द हुडकावा लागेल. 'बुद्धीप्रामाण्यवाद' हा शब्दच मुळात विवेकी बुद्धीलाच अनुलक्षून वापरला जातो, असं मला वाटतं. सबब त्याला पर्यायाची आवश्यकताच नसावी.

याच लेखात पान ७ वर आपण म्हणता की, डोळस व विधायक श्रद्धाही असतात. मला तर, किमान तीन परमश्रद्धावाद्यांच्याच विधानांधारे 'डोळस श्रद्धा' हा व्याघात वाटतो. कृपाय 'डोळस श्रद्धे'ची काही उदाहरणं द्याल काय?

टी.वी. खिलारे यांच्या लेखात पृ. १६ वर 'चिकित्सक' या शब्दाला इंग्रजीत 'स्केप्टिकल' हा शब्द कंसात दिला आहे. 'स्केप्टिकल'चा मला माहीत असलेला अर्थ 'संशयवादी' असा आहे. लेखक कृपया खुलासा करतील काय?

***य.ज. महाबळ***, औरंगाबाद ४३१ ००३.

### प्रा. गं.बा. सरदारांविषयी

'गं.बा. सरदार-व्यक्ती आणि कार्य' या ग्रंथाच्या समालोचनात देवदत्त दाभोलकर यांनी प्रश्न उपस्थित केला आहे - "संतसाहित्याची सामाजिक फलश्रुती असा विचार करताना आर्.डी. (रा.द.) रानडे आणि विनोबा यांचा विसर कसा पडू शकतो?" (*नवभारत*, मे १९९९)

"हा प्रश्न काहीसा अप्रस्तुत वाटतो" असं मत मूळ ग्रंथलेखक डॉ. हेमंत इनामदार यांनी मांडलं आहे. (*नवभारत*, जुलै, १९९९) अप्रस्तुत का, तर त्यांच्या मते "रानडे यांचा संतविषयक दृष्टिकोन केवळ पारमार्थिक... आहे. सामाजिक नाही" आणि "आचार्य विनोबा भावे यांनी केलेल्या संतकार्यसमालोचनात जशी समाजमनस्कता आहे तशीच परमार्थपरताही आहे. त्यांची दृष्टी शुद्ध सामाजिक स्वरूपाची नाही."

संतसाहित्यातील सामाजिकता आणि संतसाहित्याची सामाजिक फलश्रुती यांत, मला वाटतं, फरक करावा लागेल, आणि सामाजिक फलश्रुतीत 'समाजमनस्क परमार्थपरता' आणि 'केवळ पारमार्थिकता' यांचाही समावेश करावा लागेल. त्याशिवाय निदान संतसाहित्याच्या आकलनात परिपूर्णता येणार नाही. एवढंच नव्हे तर विवेचनाची दिशाही बदलू शकते. या गोष्टीचं स्पष्ट भान विनोबांना आहे. ज्ञानेश्वर, तुलसीदास हे महाकवी धर्मपुरुष आहेत आणि रवीन्द्रनाथ हे समग्र जीवनजाणिवेचे आधुनिक कवी आहेत, आणि ते भिन्न कोटीचे कवी आहेत, असं विनोबा म्हणतात आणि मग त्यांच्या कार्याचं मर्म उलगडतात. संतसाहित्याच्या विवेचनात 'पारमार्थिकता' अप्रस्तुत ठरवून सामाजिक फलश्रुती शोधल्यास विवेचन किती भरकटते ते वा.रं. सुंठणकरांच्या ग्रंथात दिसते. शिवाय 'शुद्ध सामाजिक दृष्टी' म्हटली तरी तिच्या पोटी एक प्रकारची पारमार्थिकता येऊ शकते. आता सरदारांच्या दृष्टीत ती येऊ शकणार नाही हे खरं आणि सरदारांची मांडणी स्वेतर मतांची नोंद करणारी नसते, हे डॉ. इनामदारांचे निरीक्षण योग्यच आहे. मात्र दाभोलकरांचा प्रश्न काहीसा अप्रस्तुत आहे, असं म्हणता येईल का?

***रवीन्द्र घवी***, पणजी







अनुक्रमणिका

# सानेगुरुजी आणि स्त्री

**मु.ब. शहा**

एका भल्या माणसाच्या स्वप्नांचे उत्तरदायित्व स्वीकारण्यापूर्वी, जिला आम्ही देवी, माता, आद्यशक्ती, जननी इत्यादी महान शब्दांत गौरवीत आलो त्या स्त्रीची देशातली स्थिती कशी आहे, हे जाणून घेतलेले बरे.

राष्ट्रीय महिला आयोगानुसार आज भारतात दर १०१ मिनिटांनंतर हुंड्यापायी कुठल्या तरी एका कन्येचा बळी जातो. दरवर्षी अशा किमान ५००० तरुणी बलीवेदीवर चढतात! अशा सत्कार्यात आपल्या महाराष्ट्राचा सगळ्या देशात दुसरा क्रमांक लागतो हेही लक्षात ठेवलेले बरे! दर ५४ मिनिटांनी एक बलात्कार, प्रत्येक वर्षी १०,००० च्या वर होणारे गर्भपात, मजुरी करणाऱ्या ३० लाख स्त्रियांना अर्धपोटी राहण्याइतकी-सुद्धा मजुरी न मिळणे हा आमच्या स्त्री-गौरवाचा जागता आणि ठसठशीत इतिहास आहे.

गुरुजींचे संस्कारसंपन्न जग या भीषण वास्तवतेपासून शेकडो योजने दूर होतं, पण त्या जगाचीही एक स्वतःसिद्ध सत्यता होती.

कुणीही माणूस भला असो की बुरा, सुष्ट असो की दुष्ट, स्वार्थी असो की संत, तो स्वतःसाठी नेहके एक 'पवित्र स्थळ' (होली प्लेस) शोधत असतो. ते स्थान मग दृश्य असो की अदृश्य. तो जी काही सत्कर्मे करतो त्या सत्कर्मांची प्रेरणा त्याला बहुतांशी या 'पवित्र स्थाना'वरून मिळत असते.

गुरुजींच्या लेखी स्त्री हे सदैव असे एक पवित्र स्थळ होते. त्यांच्या या श्रद्धेत कुठलेही अंधत्व नाही, पारंपरिकताही नाही. एका निश्चित विचाराने त्यांनी हे 'पावित्र्य प्रतीक' निवडले असावे असे वाटते.

आपल्या '*भारतीय संस्कृति*' या पुस्तकात त्यांनी 'स्त्री स्वरूप' या शीर्षकाचा एक अध्याय लिहिला आहे. त्यात जगभर स्त्रियांवर होणाऱ्या अत्याचारांचे वर्णन आहे. गुरुजींना हेही नेमके माहीत होते की, स्त्रियांवर असा अत्याचार करण्यात पुरुषसमाजाचा कसा आणि किती पुढाकार आहे. प्रश्न असा की, हे 'पवित्र स्थळ' गुरुजींनी कसे आणि का शोधले असावे?

सेवाकार्य करण्यासाठी तत्पर असलेल्या गुरुजींना विनोबांनी खानदेशातील एका लहानशा गावात – नावरानावरी – एका आश्रमाच्या संचालनाचे काम सोपवले. गुरुजींनी काही दिवसांपर्यंत निष्ठेने ते काम केले. पण त्यांचे मन रमेना. एकदा कुणालाही न सांगता-सवरता ते आश्रम सोडून निघून गेले.

अज्ञातवासात त्यांचे मन खेडेगावात त्यांनी पाहिलेल्या स्त्री-जीवनाविषयी सतत विचार करीत असे. या निरक्षर स्त्रियांना, आया-वहिणींना जीवनाचा जो अर्थ कळला तो कसा व कुठून कळला? प्रेम आणि सेवेचे त्यांना मिळालेले अद्‌भुत सामर्थ्य येते कुठून? आपल्या मुलाबाळांसाठी, स्वजनांसाठी, कुटुंबासाठी अगदी निरपेक्षपणे अनंत कष्ट सहन करण्याचा कठीण कर्मयोग त्या कुणाकडून शिकतात? जड, चेतन, पशू-पक्षी, झाडे-झुडपे सर्वांवर स्त्रियांची माया असते. त्यांच्यात हा अद्वैतभाव कसा निर्माण होतो? ग्रंथज्ञान, शास्त्रज्ञान आणि धर्मज्ञानापासून कितीतरी दूर असतात स्त्रिया. तरी त्या स्वतःसिद्धपणे सद्‌गुणांचे संवर्धन करतात, इतरांमध्ये ते गुण उतरावेत यासाठी धडपडतात. या विशाल वात्सल्याचा उगम त्यांच्यात होतो कसा? आत्म-समर्पणाची जी एक अदभुत शक्ती त्यांना लाभते, त्या शक्तीचा आदिस्रोत कुठे आहे?

गुरुजींच्या स्त्रीविषयक चिंतनामागे हे आणि असे काही मूलभूत प्रश्न होते. स्त्रीला एक 'पवित्र स्थल' मानण्यामागे या प्रश्नांचा पाठपुरावा उभा होता.

गुरुजींच्या आईने गुरुजींमधे स्त्रियोचित गुण उतरावेत यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. स्वतः गुरुजींनी एके ठिकाणी लिहिले आहे की, जोपर्यंत पुरुषांमध्ये कोमलता, प्रेम, सेवावृत्ती, परिश्रमशीलता, सहनशीलता, मूक कर्ममग्नता या गुणांचा प्रादुर्भाव होत नाही तोपर्यंत त्यांचा पूर्ण विकास झाला असे म्हणता येणार नाही. आणि स्त्री-हृदयात जोपर्यंत धैर्य, प्रसंगोपात्त आवश्यक असणारी कठोरता, पुरुषांशिवायही घर चालविण्याची हिंमत हे गुण उतरत नाहीत तोपर्यंत तिलाही पूर्ण स्त्री म्हणता येणार नाही. "माझ्या दृष्टीने विवाह यालाच म्हणतात.

अनुक्रमणिका






विवाहानंतर पुरुषाला कोमलता म्हणजे काय ते कळते, तो हृदयाचा गुण व स्त्रीबुद्धीचे गुण आत्मसात करतो. विवाह म्हणजे हृदय आणि बुद्धी, भावना आणि विचार यांचा मधुर सहयोग. पुरुषाच्या हृदयात स्त्री-गुणांचा आणि स्त्री-हृदयात पुरुष-गुणांचा उद्भव म्हणजेच विवाह. माणसाचे ध्येय आहे 'अर्धनारी नटेश्वर'! केवळ पुरुष जसा अपूर्ण आहे, तशी केवळ स्त्रीही अपूर्ण आहे. त्या दोघांनी मिळून एक पूर्ण व्यक्ती तयार होते." "माझ्या आईने माझ्या विवाहाची आवश्यकताच ठेवली नाही. तिने प्रेम, दया, परिश्रम, सेवा या स्त्री-गुणांशीच माझा विवाह लावून दिला."

गुरुजी यामुळेच अविवाहित राहिले आणि स्त्रीला एक 'पवित्र स्थळ' मानण्याचे कारणही हेच आहे.

केवळ दोन शब्दांत गुरुजींनी भारतीय स्त्रीची महानता वर्णित केली आहे. त्यांच्या दृष्टीने भारतीय स्त्री म्हणजे 'साक्षात तपस्या' आणि 'मूकसेवा' होती. तिच्या अपरंपार श्रद्धेची, अमर आशावादाची, घर सांभाळणाऱ्या सेवावृत्तीची, आणि व्यापक प्रेमभावनेची ते मुक्त कंठाने स्तुती करतात. स्त्री म्हणजे साक्षात कर्मयोग. तिला जणू स्वतःची काही इच्छाच नसते. तिच्या साऱ्या इच्छा घराच्या इच्छेत विलीन होऊन जातात. स्त्री वाणीनेही मूक असते आणि तिचे हृदयही मूक राहाते. म्हणूनच फार गूढ आणि गंभीर असते तिचे मन. ती कुणाकडून काहीही मागत नाही पण केवळ तिच्यामुळेच घर हे 'घर' असते.

आपल्या अपरंपार श्रद्धेमुळे ती अत्यंत कडू असलेल्या गोष्टी पचवू शकते. ती मंगलतेची प्रेरक शक्ती आहे. तिला वाईटातल्या वाईट माणसामधेही ईश्वराचा एखादा अंश दिसतो.

केवळ भारतीय पत्नीच आपल्या पतीला असे सांगू शकते की, "आपल्या घरात आपण कसेही असू, पण बाहेरच्या जगात नेहमीच सद्व्यवहार करीत राहा. जगातली सारी घाण घरात आणून टाकली तरी ती नाहीशी करायला मी समर्थ आहे. हवं तर माझ्यावर रागवा, ओरडा पण तुमचे काम-क्रोध बाहेरच्या जगात शांत असायला हवेत. तुमच्यातल्या पशुत्वाचे हवन करणारी पवित्र वेदी आहे मी. म्हणून जेव्हा जेव्हा या घरातून बाहेर पडाल त्या त्या वेळी 'माणूस' होऊन, पशूपती होऊन, 'शिव' होऊन बाहेर पडा."

मानवाला मानव बनवण्याचे सामर्थ्य केवळ स्त्रीमध्येच आहे या गोष्टीवर गुरुजींचा पूर्ण विश्वास होता. माणसाच्या पशुत्वाचा किनारा आहे ती. मात्र गुरुजींनी हेही सांगून ठेवले आहे की, सहनशीलता, क्षमाशीलता, दया, उदारता, त्याग या गुणांचा एक अर्थ स्त्रीची परतंत्रताही असतो हे लक्षात ठेवलेले बरे.

आधुनिक स्त्रीला आता कदाचित या गुणांवर गर्व करणे आवडणार नाही. पुरुषाच्या पशुत्वाचे हवन करण्याची जबाबदारी घेणेसुद्धा आता तिला नको असेल.

गुरुजींना स्त्रीचे मनही ज्ञात होते. म्हणून त्यांनी हेही सांगितले की, स्त्रीचे प्रेम दुर्बल आणि सेवाशक्तीहीन असू नये. तिच्या प्रेमातसुद्धा प्रखरता हवी, तेज हवे, धैर्य हवे. रडणे, अश्रु ढाळणे, लाचार होणे म्हणजे काही प्रेम नाही. प्रेम ही कर्तव्याची प्रेरणा असते. धैर्याने आणि साहसाने जीवन जगण्याची ती शक्ती असते.

मातृहृदयी सानेगुरुजी आपल्या विचारांमध्ये कमालीचे प्रगतिशील होते. भारतीय स्त्रीचा आदर्श दुर्बल असावा, तिने स्वतःला घराच्या चार भिंतींत कोंडून घ्यावे असे त्यांनी कुठेही म्हटलेले नाही. स्त्रियांचे प्रेम साऱ्या विश्वाला सामावून घेण्याइतके विशाल हवे असे ते म्हणायचे. त्यांच्या कल्पनेत असा एक स्त्री-समाज होता जो अत्यंत स्वाभिमानी, सुदृढ, निर्मळ, न्यायाधिष्ठित, उदार दृष्टिकोन असणारा आणि स्वयंभू असेल.

या स्त्री-समाजावर त्यांचा आत्यंतिक विश्वास याकरता होता की, स्त्रीच मूल्यांचे रक्षण आणि संवर्धन करू शकते याची त्यांना खात्री होती. हरिजनसेवा, ग्रामोद्योग, खादी, स्वदेशी ही तत्कालीन नूतन व्रते जर स्त्री-समाजापर्यंत योग्य रीतीने पोहोचली तर तो समाज प्राणपणाला लावून या व्रतांचे पालन, संवर्धन करील असा त्यांचा विश्वास होता.

स्नेहाने, प्रेमाने सर्वांचे रक्षण करणारी स्त्री ही मातृस्वरूपा असते त्यामुळेच ही संस्कृती 'न मातुः परं दैवतम्' असे सतत मानीत आली.

युगानुरूप स्त्रीत्व भले कसेही बदलो पण मातृत्व बदलणार नाही यावर त्यांचा विश्वास होता. प्रत्येक युगाला शेवटी या मातृत्वाची गरज भासेल.

त्याच्याच आधारे माणसाचे सत्त्व, सद्भाव आणि सद्गुण टिकून राहतील. नव्या काळातल्या नव्या जीवनमूल्यांमध्येही मातृत्वाची प्रतिष्ठा राहील, कारण ते केवळ जीव-संगोपनाचे शास्त्र नाही; ती गुणसंवर्धनाची पहिली पाठशाळा, उच्चतम ध्येयांकडे मानवाला घेऊन जाणारी पायवाट आहे.

अनुक्रमणिका






म्हणूनच श्यामची आई श्यामच्या जीवनातल्या पुरुषार्थाची प्रमुख प्रेरणा ठेरते. ती त्याला शिकवते. जीवनातल्या प्रत्येक संकटासोबत झुंजावे कसे, त्यातून पार कसे पडावे. मातृत्व जीवनातून पलायन करण्याचे शिक्षण देत नाही, ते जीवनाशी जुळवून कसे घ्यावे हे ज्याप्रमाणे शिकवते त्याप्रमाणे जीवनातल्या प्रत्येक अडी-अडचणींशी झुंजावे कसे हेही शिकवते. मातृत्वाच्या या शक्तीवर त्यांचा अखंड विश्वास होता. म्हणूनच ते असे म्हणायचे की, "जन्मदात्री माता, भारतमाता आणि विश्वमाता जगदंवा यांनी माझे पालन-पोपण केले आहे."

गुरुजींच्या काळी विधवा स्त्रियांचा प्रश्न दारुण होता. त्यांच्या अपमानाला, अवहेलनेला आणि दुर्दशेला काही अंत नव्हता. समाजाचा त्यांच्याशी असणारा निर्घृण व्यवहार गुरुजींनी प्रत्यक्षतः पाहिलाच होता. या अशा स्थितीतून केवळ विधवांचीच नव्हे तर सर्व स्त्री-समाजाची मुक्तता व्हावी असे त्यांना प्रकर्षाने वाटे. पुरुपांना असणारे सारे अधिकार, त्यांना मिळणाऱ्या सर्व संधी स्त्रियांनाही मिळायला हव्यात या विपयी ते आग्रही असत. त्यांच्यात जसा एक साहित्यकार होता तसा एक समाजशास्त्रज्ञही होता.

त्यांना जसे स्त्रियांचे स्वातंत्र्य हवे होते तशी स्त्रियांची प्रतिष्ठाही हवी होती. ही प्रतिष्ठा 'मातृरूप स्त्री'मुळे प्राप्त होते याचा ठाम विश्वास असल्यामुळे ते 'मातृवेदा'चे गायक वनले. अंमळनेरच्या छात्रालयात ते जे हस्तलिखित दैनिक काढायचे त्यातले वहुतांशी लेखन त्यांनी 'मातृभक्त' या नावानेच केले आहे. त्यांच्या आयुष्यातला प्रधान रस एकच होता आणि तो म्हणजे वात्सल्य रस!! विश्वसाहित्यात दोनच पुरुप असे दिसतात, जे मातृहृदयाचा कोपरा न कोपरा जाणतात. एक हिंदीतला सूरदास आणि दुसरे मराठीतले सानेगुरुजी.

सूर जन्मांध होता आणि गुरुजी अविवाहित. पण दोघांनाही मातृहृदय पुरेपूर कळले होते.

गुरुजींची स्त्री-जीवनातल्या सुखदुःखाशी एक विलक्षण सहभागिता होती. सूरदासानेही 'भ्रमरगीता'च्या माध्यमातून, पुरुषांच्या चंचलतेविपयी स्त्रीमनात युगानुयुगे साठलेला असंतोष आणि क्रोध फार कलात्मक पद्धतीने व्यक्त केला. विश्वसाहित्यात असलेली स्त्री- विद्रोहाची ती कदाचित पहिली ओळख असावी. भ्रमराच्या माध्यमातून गोपींनी जे टोमणे पुरुष समाजाला हाणले आहेत ती केवळ सांगण्याची गोष्ट नाही; वाचून प्रत्यक्ष अनुभवण्याची गोष्ट आहे.

पण गुरुजींचे मन तर करुणेने काठोकाठ भरलेले होते. त्यांनी सूरदासापेक्षा वेगळा मार्ग ग्रहण केला. स्त्रीचे अनेक अंगांनी जगणे आणि सोसणे त्यांनी लोकगीतांमधून शोधून काढले. हा जन-वेद वर्पानुवर्पे स्त्रियांना आत्मवल आणि आत्मभान देत आला. स्त्रीमनाच्या अनंत, अव्यक्त वेदनांना त्यातून वाणी मिळाली. गुरुजींनी महाराष्ट्रातल्या गावागावात हिंडून हे स्त्री-धन मोठ्या कष्टाने जमा केले. जवळपास २००० ओव्या गोळा करणारे ते पहिले साहित्यकार होते. स्त्री-गीतांचा त्यांचा तो संग्रह म्हणजे भारतातल्या स्त्री-मनाच्या आशा-आकांक्षांचा स्वच्छ आरसा आहे.

हे सर्व गुरुजींनी केले ते त्या मातृभावनेमुळे.

स्त्री म्हणजे कृतिहीनता आणि परावलंवन व पुरुप म्हणजे कृतिप्रवणता आणि स्वतंत्रता हे समीकरण गुरुजींना मान्य नव्हते. त्यांच्या दृष्टीने संसारचक्रातले स्त्रीचे स्थान पुरुपांपेक्षा अधिक महत्त्वाचे होते. ही भूमिका काहींना केवळ आदर्शवादी किंवा अव्यवहारी वाटू शकते. त्यामुळे *श्यामची आई* एक 'यूटोपिया' आहे, असे मानणाऱ्यांची संख्या महाराष्ट्रात कमी नाही. उग्र स्त्रीवादी विचारकांना गुरुजींच्या या भूमिकेत एकतर सवलता तरी दिसते किंवा परंपराप्रियता तरी. गुरुजींच्या वेळी समाजामध्ये असलेल्या स्त्रीविषयक मान्यता वहुतांशी पारंपरिकच होत्या, पण गुरुजी व्यवहार, विचार आणि वाणीत अत्यधिक उदारवादी होते हे विसरता येत नाही. ते दिवस स्त्री-मुक्ती आंदोलनाचे नव्हते. सिमॉन दि वोवा चे जगप्रसिद्ध पुस्तक *द सेकंड सेक्स* १९४८ साली प्रकाशित झाले होते. त्या पुस्तकाचा खरा प्रभाव सुरू झाला. १९६० च्या जवळपास. गुरुजींनी ते वाचले असेल असे वाटत नाही.

स्त्रिया, मजूर, अस्पृश्य आणि मुले हे गुरुजींच्या लेखी सर्वात जास्त शोपितवर्ग होते. या सर्वांच्या अधिकारांसाठी त्यांच्या वतीने गुरुजींनी आयुष्यभर संघर्ष केला. उदारमतवादी समजल्या जाणाऱ्यांनीसुद्धा त्या वेळी स्त्रीस्वातंत्र्यासाठी सगळा समाजच वदलणे आवश्यक असल्याचे म्हटले नव्हते. पण या सर्व वर्गांना खराखुरा न्याय द्यायचा असला तर वर्तमान समाजव्यवस्था आद्यंत वदलायला हवी असे गुरुजी मानीत. त्यांच्या मान्यतेमुळेच ते कम्युनिस्ट झाल्याचा भ्रम अनेकांना झाला होता.

गुरुजी स्वभावाने संत होते पण ते एक कार्यकर्तेही होते. हा समाज केवळ इंग्रजांच्या गुलामीतूनच नव्हे तर सर्व पद्धतीच्या

गुलामगिरीतून मुक्त व्हावा असे त्यांना वाटे. दलितांच्या, मजुरांच्या, कामगारांच्या आणि स्त्रियांच्या बाजूने यामुळेच ते अनेक लढ्यांत उतरले; प्रसंगी आपले प्राणही पणाला लावले.

एक प्रश्न मनाला सतत सतावीतच असतो. ज्या पूज्य बुद्धीने आणि प्रचंड आदराने गुरुजी स्त्री-समाजाकडे पाहत होते तशाच पूज्य बुद्धीने आणि परम आदराने खुद्द स्त्री-समाज स्वतःकडे पाहतो का? स्त्रियांवर जेवढा आणि जसा विश्वास मूल्यरक्षण आणि मूल्यसंवर्धन या बाबतीत त्यांचा होता तसा आणि तितकाच विश्वास स्त्री-समाजाचा स्वतःबद्दल आहे का?

गुरुजी तर प्रत्येक स्त्रीमध्ये भारत-मातेचे एक रूप पाहात होते. आणि ती काही केवळ कल्पना नव्हती. त्यांच्या लेखी ते वास्तव होते. काही लोकांना हे सर्वच खूप काल्पनिक वाटण्याची शक्यता आहे. पण मूल्यांसाठी तळमळणाऱ्या आजच्या भोगवादी समाजाला कदाचित गुरुजींच्या या विचारांमधून प्रकाशाची वाट सापडू शकेल.







अनुक्रमणिका

# ब्रह्मायूसूत्र

मे.पुं. रेगे



**प्रास्ताविक**

मज्झिमनिकायाच्या मध्यभागाच्या (किंवा दुसऱ्या भागाच्या) 'ब्राह्मणवग्ग' ह्या विभागात समाविष्ट असलेल्या 'ब्रह्मायुसुत्ता'चे, आय्.वी. होर्नर यांनी जे इंग्रजी भाषांतर केले आहे त्याच्यावरून प्रस्तुत मराठी भाषांतर मी केले आहे. होर्नर यांचे भाषांतर पाली टेक्स्ट सोसायटीच्या *The Collection of The Middle Length Sayings, Vol. II*, ह्या ग्रंथात आढळेल. 'ब्राह्मणवर्गा'त दहा सूत्रे आहेत. ज्यांचा बुद्धाशी संबंध आला आणि ज्यांनी त्याच्याशी संवाद केला अशा दहा ब्राह्मणांच्या नावांवरून ह्या सूत्रांची नावे ठेवली गेली आहेत. उदा. 'ब्रह्मायु-सुत्त', 'वासेट्ठ-सुत्त' (वसिष्ठ-सूत्र), इ. ही दहा सूत्रे अशी : ब्रह्मायु-सुत्त; सेल-सुत्त, अस्सलायन-सुत्त, घोटमुख-सुत्त, चङ्की-सुत्त, एसुकारी-सुत्त, धानञ्जानि-सुत्त, वासेट्ठ-सुत्त, सुभ-सुत्त, सङ्गाख-सुत्त.

होर्नर यांनी ह्या ब्राह्मणांविषयी जे म्हटले आहे ते उद्धृत करण्यासारखे आहे. "यातील काही ब्राह्मणांना गौतमाविषयी परमादर (great esteem) वाटत होता असे त्यांचे चित्रण करण्यात आले आहे. ह्याला सङ्गाख हा प्रारंभी अपवाद होता. तो ब्राह्मणांशी एकनिष्ठ होता आणि भगवंतांचे शील आणि प्रज्ञा यांची कल्पना त्याला नव्हती; पण भगवंतांना भेटायला तो तयार होता..... ह्या ब्राह्मणांचे इतर ब्राह्मणांशी जे संबंध होते त्यांची दखल घेण्यासारखी आहे. उदा. ब्रह्मायु अतिशय वृद्ध, संपन्न, विद्वान होता; त्याच्याविषयी इतरांना पूज्यभावना होती आणि पूज्य व्यक्तींविषयी त्याचाही असाच भाव असे. ब्राह्मणांच्या विद्यांत पारंगत असलेला उत्तर त्याचा शिष्य होता. सेल ह्याचे ३०० ब्राह्मण अनुयायी होते. त्या सर्वांना भगवंतांनी भिक्षुपदाची दीक्षा दिली. अस्सलायनाचे आदेश शिरसावंद्य मानणारे ५०० ब्राह्मण होते. ते काही कामकाजासाठी म्हणून श्रावस्ती येथे राहात होते. घोटमुख, एसुकारी आणि धानञ्जानि एक एकटे राहात होते असे दिसते. जोपसाद येथे राहणाऱ्या ५०० ब्राह्मणांनी चङ्की ह्या तेथेच राहणाऱ्या ब्राह्मणाला गौतमाला भेटण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. वासेट्ठ आणि भारद्वाज हे ब्राह्मण तरुण (काही काळ) इच्छानङ्कल येथे राहात होते आणि तेथे अनेक श्रीमंत आणि प्रतिष्ठित ब्राह्मण राहात होते. शुभ एका गृहपतीच्या (गृहस्थाच्या) घरात राहात होता. आणि सङ्गाख चंडलकप्प येथे राहात होता. तेथे त्याच्या परिचयाची

अनुक्रमणिका

एक ब्राह्मण स्त्री राहात होती व तिच्या आग्रहावरून तो भगवंतांना भेटायला गेला. ह्या ब्राह्मणांचा गौतमावरोवर जो संवाद झाला त्याचा परिणाम म्हणून ते एकतर उपासक झाले किंवा त्यांनी भिक्षुसंघात प्रवेश केला – ह्याला एकमात्र अपवाद म्हणजे चङ्की. पण चङ्कीच्या नावाचे जे सूत्र आहे त्याच्यात, सर्व ब्राह्मणांनी गौतमाला भेटायला जावे असा आग्रह तो धरतो. तो गौतमाचे दीर्घ आणि, उपालीने केलेल्या प्रशंसेच्या तुलनेत, वास्तवाच्या वऱ्याच जवळ असलेले असे स्तुतिगीत गातो. गौतमासारख्या अपरिमित तेजाने (वर्णाने) युक्त असलेल्या कुणाही व्यक्तीने ब्राह्मणांना भेटायला जावे हे त्याला योग्य वाटत नाही. जेव्हा ते ब्राह्मण येतात तेव्हा गौतम आपले प्रवचन प्रामुख्याने कापठिक नावाच्या ब्राह्मण तरुणाला उद्देशून करतो. हाही अतिशय विद्वान होता आणि सत्याविषयीची (धम्माविषयीची) जागृती कशी साधावी आणि सत्य कसे प्राप्त करून घ्यावे ह्याचे वरेचसे आकलन त्याला झाल्यानंतर तो उपासक झाला." (उपरोक्त : पृ. xx, xxi)

---

## नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स

१. मी असे ऐकले आहे. एकदा भगवान भिक्षूंच्या मोठ्या समुदायावरोबर – पाचशे भिक्षूंसोबत – विदेहात फिरत होते. त्यावेळी ब्रह्मायु हा ब्राह्मण मिथिलेत राहात होता. तो वृद्ध जराजर्जर होता, त्याचे वय झाले होते, त्याने आपल्या आयुष्याचा मोठा भाग व्यतीत केला होता आणि त्याचा अंत जवळ आला होता. एकशेवीस वर्षे हे त्याचे वय होते. तो तीन वेदांत पारंगत होता. वैदिक पदांचे अर्थ आणि कर्मकांडाचे नियम ह्यांचे त्याला चांगले ज्ञान होते. वर्णांचे शुद्ध उच्चार करण्याचे शास्त्र, वाक्यांच्या अर्थाचे विवरण करण्याचे शास्त्र, आणि पाचवे म्हणजे इतिहास (पुराणकथा) ह्यांत तो प्रवीण होता, वेदांचा पदपाठ, व्याकरण, लोकांत रूढ असलेले तत्त्वज्ञान, तसेच महापुरुषाची लक्षणे ओळखणे ह्या विद्या त्याला पूर्णपणे अवगत होत्या. त्या ब्राह्मण ब्रह्मायूच्या असे कानी आले की, शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलापासून प्रव्रज्या घेऊन विदेहामध्ये – मोठ्या भिक्षुसमूहाबरोबर – पाचशे भिक्षूंना सोबत घेऊन – फिरत आहे. ह्या पूज्य गौतमाची शुभ अशी कीर्ती पसरली आहे : "हा भगवान आहे, ह्याला सम्यक् संबोधी प्राप्त झाली आहे, ज्ञान आणि आचरण ह्यांनी हा संपन्न आहे, हा सुगत आहे, जगाचे ज्ञान ह्याला आहे, नाठाळ माणसांना (त्यांचे दमन करून योग्य मार्गाने नेणारा) हा श्रेष्ठ सारथी आहे, देवांचा आणि माणसांचा हा गुरू आहे, हा वुद्ध आहे, हा भगवान आहे. त्याने श्रेष्ठ ज्ञान प्राप्त केले असून, देव, मार, ब्रह्म, श्रमण आणि ब्राह्मण यांच्यासह सर्व जगाला, देवमनुष्यांना तो ते शिकवीत आहे. तो धर्माची शिकवण देतो; ज्याचा प्रारंभ शुभ आहे, जो मध्यभागी शुभ आहे आणि ज्याचे पर्यवसान शुभ आहे असा हा धर्म आहे. ब्रह्मचर्याचे (निर्वाण प्राप्त करून देणाऱ्या श्रेष्ठ जीवनमार्गाचे) तो विवरण करतो; ज्या शब्दांत ह्या जीवनमार्गाचे वर्णन होते त्या शब्दांचे आणि त्यांच्या आशयाचे तो विवरण करतो. परिपूर्ण आणि अत्यंत शुद्ध असे ब्रह्मचर्य तो प्रकट करतो. ह्या प्रकारच्या अर्हतांचे दर्शन कल्याणप्रद असते."

२. आता त्यावेळी ब्राह्मण ब्रह्मायूसोबत उत्तर हा ब्राह्मण शिष्य म्हणून राहात होता. तो तीन वेदांत पारंगत होता, वैदिक पदे आणि कर्मकांडाचे नियम ह्यांचे त्याला चांगले ज्ञान होते. वर्णांचे शुद्ध उच्चार करण्याचे शास्त्र, वाक्यांच्या अर्थाचे विवरण करण्याचे शास्त्र आणि पाचवे म्हणजे इतिहास (पुराणकथा) ह्यांत तो प्रवीण होता. वेदांचा पदपाठ, व्याकरण, लोकांत रूढ असलेले तत्त्वज्ञान, तसेच महापुरुषाची लक्षणे ओळखणे ह्या विद्या त्याला पूर्णपणे अवगत होत्या. तो ब्राह्मण ब्रह्मायु त्या तरुण ब्राह्मणाला, उत्तराला उद्देशून म्हणाला, "हे तात उत्तरा, शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलापासून प्रव्रज्या घेऊन विदेहामध्ये मोठ्या भिक्षुसमूहासोवत – पाचशे भिक्षूंना सोवत घेऊन – फिरत आहे. ह्या पूज्य गौतमाची अशी शुभ कीर्ती पसरली आहे की, हा भगवान आहे, ह्याला सम्यक्

संबोधी प्राप्त झाली आहे, ज्ञान आणि आचरण यांनी हा संपन्न आहे, हा सुगत आहे, जगाचे ज्ञान ह्याला आहे, नाठाळ माणसांचे दमन करून त्यांना योग्य मार्गाने नेणारा हा श्रेष्ठ सारथी आहे, देवांचा आणि माणसांचा हा गुरू आहे, हा बुद्ध आहे, हा भगवान आहे. त्याने श्रेष्ठ ज्ञान प्राप्त केले असून, देव, मार, ब्रह्म, श्रमण आणि ब्राह्मण यांच्यासह सर्व जगाला, देवमनुष्यांना तो ते शिकवीत आहे. तो धर्माची शिकवण देतो; ज्याचा प्रारंभ शुभ आहे, जो मध्यभागी शुभ आहे आणि ज्याचे पर्यवसान शुभ आहे असा हा धर्म आहे. ब्रह्मचर्याचे (निर्वाण प्राप्त करून देणाऱ्या श्रेष्ठ जीवनमार्गाचे) तो विवरण करतो; ज्या शब्दांत ह्या जीवनमार्गाचे वर्णन होते त्यांचे आणि त्यांच्या आशयाचे तो विवरण करतो. परिपूर्ण आणि अत्यंत शुद्ध असे ब्रह्मचर्य तो प्रकट करतो. ह्या प्रकारच्या अर्हतांचे दर्शन कल्याणप्रद असते तेव्हा, तात उत्तरा, तू श्रमण गौतमाकडे जा, आणि त्याच्याकडे गेल्यावर तो श्रमण गौतम हा खरोखरच ज्याची कीर्ती पसरली आहे तो भगवान गौतम आहे की नाही हे जाणून घे; भगवान गौतम जसा आहे (अशी त्याची कीर्ती झाली आहे) तसाच तो आहे की नाही हे पहा. अशा रीतीने मी त्या पूज्य गौतमाला ओळखीन."

"आपण सांगता तशी मी त्या पूज्य गौतमाची माहिती करून घेईन; ज्याची अशी कीर्ती पसरली आहे तोच भगवान गौतम हा आहे की नाही आणि तो भगवान गौतम (त्याची जशी कीर्ती पसरली आहे) तसा आहे की नाही हे जाणून घेईन."

"हे तात उत्तरा, आपल्या मंत्रांत महापुरुषाची बत्तीस लक्षणे चालत आली आहेत. ज्याच्या ठिकाणी ती असतात त्या महापुरुषाच्या दोनच गती संभवतात; तिसरी नाही. गृहस्थाचे जीवन जर त्याने स्वीकारले तर तो चक्रवर्ती राजा होतो, तो धार्मिक, धर्मराजा होतो, चारी दिशांपर्यंत त्याचे राज्य विस्तारलेले असते (तो सबंध जगाचा राजा असतो), आपल्या राज्यात तो स्थैर्य स्थापन करतो. त्याचे सात कोष (खजिने) असतात : चक्र-कोष[१], हस्ति-कोष, अश्व-कोष, रत्न-कोष, स्त्री-कोष, गृहपति-कोष आणि सातवा मन्त्री-कोष. त्याचे सहस्राहून अधिक पुत्र असतात. शूर, वीरपुरुषाला उचित अशी शरीरे धारण करणारे असे ते असतात. शत्रूसेनेचा चुराडा करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असते. सागरापर्यंतच्या भूमीवर, दण्डशक्तीने नव्हे, खड्गाच्या बळावर नव्हे, तर धर्माने विजय मिळवून तो तिच्यावर निवास करतो. पण जर तो प्रव्रज्या घेऊन, घराचा त्याग करून, अनिकेत स्थितीत जगेल तर तो अर्हत होतो, (ज्याला सम्यक्-ज्ञान प्राप्त झाले आहे असा) सम्मासम्बुद्ध होतो, जगावरचे अवगुंठन तो दूर करतो. हे तात उत्तरा, मी तुला मन्त्र देणारा आहे, तू ते घेणारा आहेस."

३. "जसा आपला आदेश" असे उत्तर त्या तरुण ब्राह्मण उत्तराने ब्राह्मण ब्रह्मायूला दिले. तो आपल्या आसनावरून उठला, ब्रह्मायूला त्याने अभिवादन केले, त्याला प्रदक्षिणा घातली आणि विदेहात भगवंतांना शोधायला निघाला. ह्या उद्देशाने वाटचाल करीत असताना तो हळूहळू जेथे भगवंत होते तेथे येऊन ठेपला. त्यांच्या जवळ आल्यावर त्याने त्यांचे कुशल विचारले. त्यांच्याशी प्रेमादरपूर्वक संभाषण केल्यानंतर तो मर्यादेने एका बाजूला बसला. अशा रीतीने आदराने अंतर राखून (भगवंतांसमोर) बसला असताना त्या तरुण ब्राह्मण उत्तराने भगवंतांच्या शरीरावर महापुरुषाची बत्तीस लक्षणे दिसतात काय ह्याचे निरीक्षण केले. आणि त्या तरुण ब्राह्मण उत्तराला भगवंतांच्या शरीरावर दोन वगळून बाकी सर्व बत्तीस लक्षणे दिसली. महापुरुषाची दोन लक्षणे (भगवंतांच्या शरीरावर) आहेत की नाहीत अशी शंका त्याला आली, तो गोंधळला, (त्यांच्याविषयी) त्याची निश्चिती होईना, त्याचे समाधान झाले नाही – जे वस्त्राने झाकलेले असते त्याला कोषाचे आवरण आहे की नाही आणि जीभ लांब आहे की नाही (ही ती दोन लक्षणे होती). मग भगवंतांच्या मनात विचार आला की, 'ह्या तरुण ब्राह्मण उत्तराला माझ्या शरीरावर महापुरुषाची, दोन वगळली तर बाकी सर्व, बत्तीस लक्षणे दिसतात. महापुरुषाच्या ह्या दोन लक्षणांविषयी त्याला शंका आहे, तो गोंधळला आहे, अनिश्चित आणि असमाधानी आहे. जे वस्त्राने झाकलेले असते त्याच्यावर कोषाचे आवरण आहे का आणि माझी जीभ लांब आहे का?' मग भगवंतांनी त्या तरुण ब्राह्मण उत्तराला अशी अतींद्रिय शक्ती दिली की भगवंतांनी जे वस्त्राने झाकले होते त्याच्यावर कोषाचे आवरण होते हे त्याने पाहिले. मग भगवंतांनी आपली जीभ बाहेर काढली आणि तिने आपल्या दोन्ही कानांना मागे व पुढे थोपटले, आपल्या नाकपुड्यांवर मागे आणि पुढे आघात केले आणि आपले सबंध कपाळ तिने झाकले. मग त्या तरुण ब्राह्मण उत्तराच्या मनात असा विचार आला की, 'ह्या श्रमण गौतमाच्या ठिकाणी महापुरुषाची बत्तीस लक्षणे आहेत. समजा, आता मी श्रमण गौतमाच्या जवळ

अनुक्रमणिका

राहून त्याच्या मागून जात राहिलो आणि त्याची चालचलणूक लक्षपूर्वक पाहिली तर कसे?' मग तो तरुण ब्राह्मण उत्तर भगवंतांच्या जवळ सात महिने राहून सोबत करणाऱ्या सावलीसारखा त्यांच्या मागून फिरला.

४. मग तो तरुण ब्राह्मण उत्तर, सात महिन्यांनंतर, विदेहातील मिथिला येथे जायला चालत निघाला. सावकाश चालत तो मिथिलेला ब्राह्मण ब्रह्मायूकडे पोचला. त्या ब्राह्मण ब्रह्मायूकडे गेल्यावर, त्याला अभिवादन करून तो आदराने अंतर राखून बसला. तो ब्राह्मण युवक उत्तर अशा रीतीने आदरपूर्वक अंतर राखून बसलेला असताना ब्राह्मण ब्रह्मायु त्याला उद्देशून म्हणाला, "काय, तात उत्तरा, आदरणीय गौतमांची जी कीर्ती पसरली आहे ती यथार्थ अशीच आहे ना, विपरीत नाही ना? आदरणीय गौतम तसेच आहेत, वेगळे नाहीत असे आहे ना?" "महोदय, आदरणीय गौतमाची जी कीर्ती पसरली आहे ती यथार्थ अशीच आहे, विपरीत नाही. आदरणीय गौतम तसेच आहेत, वेगळे नाहीत. आदरणीय गौतम महापुरुषाच्या बत्तीस लक्षणांनी युक्त असाच आहे.

"पूज्य गौतम सुप्रतिष्ठितपाद आहे; (तो चालताना सबंध पाऊल जमिनीवर एकदम ठेवतो – टाच किंवा चवडा प्रथम टेकीत नाही.) त्याच्या तळपायावर सहस्र आरांची, नाभी आणि कडा यांनी युक्त अशी परिपूर्ण चक्रे आहेत.

"पूज्य गौतमाच्या टाचा लांब आहेत.

"पूज्य गौतमाच्या हातापायांची बोटे लांब आहेत. पूज्य गौतमाचे हात आणि पाउले मऊ आणि कोमल आहेत. पूज्य गौतमाच्या हातांच्या आणि पायांच्या बोटांमध्ये सम अंतर आहे. पूज्य गौतमाचा घोटा पायाच्या मध्यभागी आहे (इतरांप्रमाणे टाचांच्या जवळ नाही.) पूज्य गौतमाचे पाय सारंगाच्या पायांसारखे आहेत. (म्हणजे त्यांच्या सभोती मांसाचे समान वेष्टण आहे, एकाच बाजूला मांसाचा गोळा आहे असे नाही.)

"पूज्य गौतम सरळ उभा असताना (वाकलेला नसताना) आपल्या दोन्ही हातांच्या तळव्यांनी आपल्या गुडघ्यांना स्पर्श करू शकतो, त्यांचे मर्दन करू शकतो. (तो आजानुबाहू आहे.) पूज्य गौतम आपल्या वस्त्राने जे झाकतो त्याला कोषाचे वेष्टण आहे.

"पूज्य गौतमाचा वर्ण सोनेरी आहे.

"पूज्य गौतमाची त्वचा सोनेरी वर्णाची आहे, नितळ आहे. त्याची त्वचा नितळ असल्यामुळे धुळीचे कण किंवा मळ त्याच्या शरीराला चिकटत नाहीत.

"पूज्य गौतमाचे केस वेगवेगळे असतात (एकमेकात गुंतलेले नसतात). एक एक केस एकेका छिद्रात उगवतो.

"पूज्य गौतमाचे केस सरळ वर वाढतात. सरळ वर वाढणारे केस दाट निळ्या वर्णाचे, काजळाच्या रंगाचे असतात, (सरळ वर वाढल्यावर) ते उजव्या बाजूला वाकून कुण्डलाकार होतात.

"पूज्य गौतमाचे शरीर ब्रह्माच्या शरीरासारखे सरळ, उंच आहे. पूज्य गौतमाच्या शरीरावर सात वहिर्वक्र पृष्ठभाग आहेत. (त्याचे हात, पाय, दोन खांदे आणि पाठ ह्यांच्यावर भरीव मांस आहे.)

"पूज्य गौतमाच्या शरीराचा पुढचा भाग सिंहाच्या शरीरासारखा आहे.

"पूज्य गौतमाच्या खांद्यांमध्ये खोलगट भाग नाही.

"पूज्य गौतमाचे शरीर एखाद्या वटवृक्षासारखे समप्रमाण आहे.

"त्याचे शरीर जेवढे उंच आहे तेवढेच त्याचे बाहू पसरलेले असताना लांब असतात; आणि त्याचे बाहू पसरलेले असताना जेवढे लांब असतात तेवढेच त्याचे शरीर उंच आहे.

"पूज्य गौतमाची छाती समप्रमाणात गोलट आहे.

"पूज्य गौतमाची रुची सूक्ष्म, अभिज्ञ आहे.

"पूज्य गौतमाचा जबडा सिंहासारखा आहे.

"पूज्य गौतमाला चाळीस दात आहेत.

"पूज्य गौतमाचे दात सम आहेत.

"पूज्य गौतमाचे दात अविरल आहेत.

"पूज्य गौतमाच्या (दातांचे) सुळके तेजस्वी आहेत.

"पूज्य गौतमाची जिव्हा दीर्घ आहे.

"पूज्य गौतमाचा आवाज ब्रह्माच्या आवाजासारखा आहे.

"त्याची वाणी करविक पक्षासारखी आहे.

"पूज्य गौतमाचे डोळे सुंदर निळ्या वर्णाचे आहेत.

"पूज्य गौतमाच्या पापण्यांचे केस गायीच्या पापण्यांच्या केसांसारखे आहेत.

"पूज्य गौतमाच्या भिवयांच्या मध्ये जे केस आहेत ते कापसासारखे शुभ्र आणि मऊ आहेत.

"पूज्य गौतमाचे शिर राजाच्या शिरोभूषणासारखे (पागोट्यासारखे) (समप्रमाण) आहे. पूज्य गौतम महापुरुष आहे आणि महापुरुषाचे हे लक्षणही त्याच्या अंगी आहे.

अनुक्रमणिका

"पूज्य गौतमाच्या ठिकाणी महापुरुषाची ही बत्तीस लक्षणे एकवटली आहेत."

५. "चालताना पूज्य गौतम उजवे पाऊल प्रथम पुढे टाकतो. तो पाऊल फार पुढे टाकीत नाही किंवा फार जवळ ठेवीत नाही. तो फार जलद चालत नाही किंवा फार मंदपणे चालत नाही. चालताना त्याचा गुडघा गुडघ्यावर, किंवा घोटा घोट्यावर आदळत नाही. तो चालताना आपल्या मांड्या वरती किंवा खाली, आतल्या बाजूला किंवा बाहेरच्या बाजूला वाकवीत नाही. चालताना पूज्य गौतम शरीराच्या खालच्या भागाच्या शक्तीवर चालतो, सबंध शरीराच्या शक्तीने चालत नाही. पूज्य गौतम जेव्हा सभोवती पाहतो तेव्हा तो सबंध शरीर वळवून पाहतो (सिंहावलोकन करतो), तो वर पाहत नाही किंवा तो खाली पाहत नाही, (पुढच्या वाटेचे) अवलोकन केल्याशिवाय तो चालत नाही, कारण तो नांगराएवढ्या अंतरावर पुढे पाहत असतो; ह्याच्या पुढच्या अंतरावर त्याचे ज्ञान आणि दर्शन अनावृत असते. जेव्हा तो घरात प्रवेश करतो तेव्हा तो आपले शरीर वर वाकवीत नाही किंवा खाली वाकवीत नाही; तो ते आतल्या बाजूला किंवा बाहेरच्या दिशेने वाकवीत नाही. आपल्या आसनापासून तो फार दूर वळत नाही किंवा फार जवळ वळत नाही, आपल्या हाताने आपले आसन घट्ट पकडून तो त्यावर बसत नाही किंवा त्याच्यावर झेप टाकून बसत नाही (तो सावकाश, अलगदपणे बसतो); घरात बसलेला असताना हातांनी तो चाळे करीत नाही किंवा पायांनी चाळे करीत नाही. तो गुडघ्यावर आडवा गुडघा ठेवून किंवा घोट्यावर घोटा आडवा ठेवून बसत नाही, अथवा हनुवटी हातात धरून बसत नाही. घरात बसलेला असताना तो निर्भय असतो, (त्याला कोणताही संशय नसतो, तो निश्शंक असतो,) तो थरकापत नाही, लटलटत नाही, लुकलुकत नाही. पूज्य गौतम जेव्हा (कुणाच्याही) घरात बसलेला असतो तेव्हा तो अशा प्रकारे निर्भयपणे, निष्कंप असा, न लटलटता, न लुकलुकता बसलेला असतो; अक्षुब्ध असा तो असतो. घरात तो एकचित्तपणे, अलिप्तपणे बसलेला असतो.

"तो पात्रात जेव्हा पाण्याचा स्वीकार करतो तेव्हा तो ते पात्र फार वर उचलीत नाही किंवा फार खाली धरीत नाही; तो ते आतल्या बाजूला वळवीत नाही किंवा बाहेरच्या बाजूला वळवीत नाही. तो पात्रात अतिशय थोडे पाणी स्वीकारीत नाही किंवा अती पाणी स्वीकारीत नाही. पात्र धुताना तो खळखळ असा आवाज करीत नाही; गरगरा फिरविल्याशिवाय तो पात्र धुतो. ते जमिनीवर ठेवल्याशिवाय तो हात धूत नाही. त्याचे हात धुऊन होईपर्यंत पात्र धुतलेले असते; पात्र धुऊन होईपर्यंत हात धुतलेले असतात. पात्रातील पाणी फार दूर पडणार नाही, फार जवळ पडणार नाही आणि इतस्ततः शिंपडले जाणार नाही अशा रीतीने तो ते फेकतो.

"तो जेव्हा भाताचा स्वीकार करतो तेव्हा तो पात्र वर वळवीत नाही किंवा खाली वळवीत नाही; आतल्या किंवा बाहेरच्या बाजूला तो ते वळवीत नाही. तो अति थोडा किंवा अति जास्त भात स्वीकारीत नाही. पूज्य गौतम (भाताशी योग्य ठरेल अशा) प्रमाणात व्यञ्जन (कढी, आमटी इ.) सेवन करतो आणि व्यञ्जनाचे सेवन करताना भाताकडे दुर्लक्ष करीत नाही. पूज्य गौतम प्रत्येक घास तोंडात दोन, तीन वेळा फिरवून मग तो गिळतो. भाताचा एकही दाणा भरडून निघाल्याशिवाय त्याच्या शरीरात प्रवेश करीत नाही आणि भाताचा एकही दाणा तोंडात असेपर्यंत तो पुढचा घास घेत नाही. पूज्य गौतम अन्नाच्या स्वादाचा अनुभव घेत त्याचे सेवन करतो. पण ह्या स्वादाची लालसा त्याला नसते.

"पूज्य गौतम अष्टविध[२] अन्नाचे सेवन करतो – पण तो ते मजा म्हणून किंवा जिभेचे कोड पुरविण्यासाठी, किंवा शरीर मंडित किंवा विभूषित करण्यासाठी, (शरीर देखणे असावे, दिसावे म्हणून) करीत नाही. तर शरीराची धारणा व्हावी, ते कार्यक्षम असावे, निरामय असावे आणि ब्रह्मचर्याला अनुकूल असावे यासाठी पुरेशा अन्नाचे तो सेवन करतो. असे करीत असताना त्याच्या मनातील विचार असा असतो की, 'अशा रीतीने मी जुनी (अगोदरची) वेदना चिरडून टाकीन आणि नवी वेदना उद्भवू देणार नाही, माझी जीवनयात्रा चालू राहील, मला दोष लागणार नाही, मला स्वास्थ्य लाभेल.'

"अन्नाचे सेवन केल्यानंतर जेव्हा तो पात्रात पाणी घेतो तेव्हा तो पात्र फार वर धरीत नाही.. इ.; पात्र धुताना खळखळाट करीत नाही.... इ. (वरील परिच्छेदातील वर्णनाप्रमाणे) अन्नसेवन केल्यानंतर तो पात्र, फार दूर किंवा फार जवळ ठेवीत नाही; कारण तो त्या पात्राविषयी उदासीन नसतो, (तो त्याची काळजी घेतो) पण ते सुरक्षित ठेवण्यासाठी तो चिंताग्रस्त असत नाही. अन्नसेवन केल्यानंतर तो क्षणभर स्तब्ध बसतो पण आभार मानयला तो वेळ लावीत नाही. भोजन झाल्यानंतर तो आभार मानतो. भक्षिलेल्या अन्नाला तो नावे ठेवीत नाही, पुढच्या

भोजनाची प्रतीक्षा करीत नाही. उलट धम्माविषयी प्रवचन करून तो जमलेल्या मंडळीला आनंदित करतो, उत्तेजित करतो, प्रेरित करतो, उल्हसित करतो. धम्माविषयी प्रवचन करून जमलेल्या मंडळींना आनंदित केल्यानंतर.... (इ.) तो आसनावरून उठतो आणि प्रस्थान करतो. तो फार जलद चालत नाही किंवा फार सावकाश चालत नाही. (जमलेल्या मंडळीपासून) सुटका करून घेण्यासाठी उत्सुक असल्यासारखा तो चालत नाही.

"पूज्य गौतमाचे चीवर त्याच्या देहावर फार वर परिधान केलेले नसते किंवा फार खाली लोंबत नसते. ते त्याच्या देहाला चिकटून बसलेले नसते किंवा फार सैल नसते. पूज्य गौतमाचे वस्त्र वाऱ्याने फडफडत नसते. धुळीचे कण किंवा मळ त्याला चिकटलेला नसतो.

"जेव्हा तो विहारामध्ये जातो तेव्हा तो नेमलेल्या आसनावर बसतो. बसल्यानंतर आपले पाय धुतो. पूज्य गौतम आपले पाय सुशोभित करण्याकडे ध्यान देत नाही. आपले पाय धुतल्यानंतर तो मांडी घालून (आसनावर) बसतो. तो ताठ शरीराने बसतो आणि समोरच्या भिक्षूंची मने जागरूक व एकाग्र बनवितो. स्वतःला पीडा होईल किंवा इतरांना पीडा होईल असा प्रयत्न तो करीत नाही; ह्या दोघांनाही पीडा होईल असा प्रयत्न तो करीत नाही. तो बसला असताना जेणेकरून स्वतःचे हित साधेल, इतरांचे हित साधेल, ह्या उभयांचे हित साधेल, सर्व जगाचे हित साधेल असा प्रयत्न तो करतो. विहारात भिक्षुसंघाला धम्माविषयी उपदेश करताना, त्या परिषदेला चढवून ठेवीत नाही किंवा तिला हीन लेखीत नाही; उलट धम्मविषयक प्रवचनाने तो तिला आनंदित करतो, उत्साहित करतो, प्रेरित करतो, उल्हसित करतो. पूज्य गौतमाच्या मुखातून जे शब्द बाहेर पडतात त्यांची आठ वैशिष्ट्ये असतात. ते स्पष्ट असतात, आकलनीय असतात, मंजुळ असतात, श्रवणीय असतात, त्यांच्यात ओघ असतो, ते स्वच्छ असतात, गंभीर असतात आणि निनादत असतात. त्यामुळे जेव्हा पूज्य गौतम परिषदेला भाषण करून उपदेश करतो तेव्हा त्याचे शब्द त्या परिषदेपलीकडे ऐकू येत नाहीत. पूज्य गौतमाने आपल्या धम्मविषयक प्रवचनाने परिषदेला आनंदित, उत्साहित, प्रेरित, उल्हसित केल्यानंतर भिक्षू, आपल्या आसनावरून उठून, त्याच्याकडे दृष्टी स्थिर करीत नाखुषीने निघून जातात.

"महोदय, आम्ही पूज्य गौतमाला चालताना पाहिले आहे, स्थिरपणे उभा असताना पाहिले आहे, घरात प्रवेश करताना पाहिले आहे, घरात स्तब्धपणे बसलेला असताना पाहिले आहे, घरात भोजन करताना पाहिले आहे, भोजन केल्यानंतर स्तब्धपणे बसलेला असताना पाहिले आहे, भोजन केल्यानंतर आभार मानताना पाहिले आहे, विहाराकडे जाताना त्याला पाहिले आहे, विहारात स्तब्धपणे बसलेला असताना पाहिले आहे, विहारात भिक्षुसंघाला धम्माविषयी उपदेश करताना पाहिले आहे. पूज्य गौतम असा, असा आहे; ह्या वर्णनापेक्षाही अधिक काहीतरी आहे."

६. हे सांगून झाल्यानंतर तो ब्राह्मण ब्रह्मायु आसनावरून उठला, आपले उत्तरीय त्याने सावरले, हात जोडून भगवन्तांना अभिवादन केले आणि तो तीनदा उद्‌गारला :

"त्या अर्हत्, सम्यक् संबोधी प्राप्त झालेल्या भगवंतांना नमस्कार असो.

"त्या अर्हत्, सम्यक् संबोधी प्राप्त झालेल्या भगवंतांना नमस्कार असो.

"त्या अर्हत्, सम्यक् संबोधी प्राप्त झालेल्या भगवंतांना नमस्कार असो.

"कदाचित कुठेतरी, कधीतरी ह्या पूज्य गौतमाची आणि माझी भेट होईल, कदाचित त्याचे-माझे संभाषणही होईल."

७. नंतर भगवान विदेहातून वाटचाल करीत असताना यथाक्रम मिथिला येथे पोचले. तेथे असताना भगवंत मखादेवाच्या आंबराईत उतरले. मिथिलेच्या ब्राह्मणांनी आणि गृहपतींनी (गृहस्थांनी) ऐकले की, 'शाक्यपुत्र श्रमण गौतम, शाक्यकुलापासून प्रव्रज्या घेऊन विदेहामध्ये मोठ्या भिक्षुसंघासमवेत, पाचशे भिक्षूंच्या समुदायासोबत फिरत आहे. ह्या पूज्य गौतमाची अशी शुभ कीर्ती पसरली आहे की, हा भगवान आहे, ह्याला सम्यक् संबोधी प्राप्त झाली आहे, विद्या आणि आचरण ह्यांनी हा संपन्न आहे, हा सुगत आहे, जगाचे ज्ञान ह्याला आहे, नाठाळ माणसांचे दमन करून त्यांना योग्य मार्गाने नेणारा हा श्रेष्ठ सारथी आहे, देवांचा आणि माणसांचा हा गुरू आहे, हा भगवान आहे, हा बुद्ध आहे. त्याने श्रेष्ठ ज्ञान प्राप्त केले असून, देव, मार, ब्रह्म, श्रमण आणि ब्राह्मण यांच्यासह सर्व जगाला, देव-मनुष्यांना तो ते शिकवीत आहे. तो धम्माची शिकवण देतो; ज्याचा प्रारंभ शुभ आहे, जो मध्यभागी शुभ आहे आणि ज्याचे पर्यवसान शुभ आहे असा हा धम्म आहे. ब्रह्मचर्याचे तो विवरण करतो.

अनुक्रमणिका






'ज्या शब्दांत ह्या ब्रह्मचर्याचे विवरण होते त्या शब्दांचे आणि त्यांच्या आशयाचे तो स्पष्टीकरण करतो. परिपूर्ण आणि अत्यंत शुद्ध असे ब्रह्मचर्य तो प्रकाशित करतो. ह्या प्रकारच्या अर्हतांचे दर्शन कल्याणप्रद असते.'

मग मिथिलेचे ते ब्राह्मण आणि गृहपती भगवंतांकडे गेले. त्यांतील काही भगवंतांकडे गेल्यावर आणि त्यांना अभिवादन केल्यावर आदरपूर्वक एका बाजूला बसले. काहींनी भगवंतांना त्यांचे कुशल विचारले आणि त्यांच्याशी प्रेमादराने संभाषण करून ते बाजूला बसले; काहींनी भगवंतांना हात जोडून नमस्कार केला व ते बाजूला बसले; काहींनी भगवंतांना आपले नाव आणि गोत्र सांगितले व ते बाजूला बसले, तर काहीजण स्तब्धपणे बाजूला बसले.

८. ब्राह्मण ब्रह्मायूने असे ऐकले की, 'शाक्य कुलातील श्रमण गौतम, शाक्यकुलापासून प्रव्रज्या घेऊन, मिथिलेला आला आहे आणि तो मखादेवाच्या आंबराईत राहात आहे.' मग ब्राह्मण ब्रह्मायु काही तरुण ब्राह्मणांसोबत मखादेवाच्या आंबराईकडे गेला. जेव्हा ब्राह्मण ब्रह्मायु मखादेवाच्या आंबराईजवळ पोचला तेव्हा त्याच्या मनात असा विचार आला, 'मी भेटीसाठी येत आहे असा संदेश श्रमण गौतमाला पाठविण्यापूर्वी मी त्याला भेटायला जाणे उचित नाही.' तेव्हा ब्राह्मण ब्रह्मायूने एका ब्राह्मण तरुणाला सांगितले, "हे तरुण ब्राह्मणा, श्रमण गौतमाकडे जा; त्याच्याकडे गेल्यावर माझ्या वतीने त्याला विचार की त्याची प्रकृती चांगली आहे ना? त्याला काही विकाराचा उपसर्ग झालेला नाही ना? त्याचा शारीरिक उत्साह, बळ, स्वास्थ्य उत्तम आहे ना? तू त्याला सांग की, 'हे गौतमा, ब्राह्मण ब्रह्मायूने आपल्याला असे विचारले आहे की आपली प्रकृती चांगली आहे ना? आपल्याला कोणत्याही विकाराचा उपसर्ग झालेला नाही ना? आपला शारिरिक उत्साह, बळ, स्वास्थ्य उत्तम आहे ना?' आणि त्याला हे सांग की, 'हे गौतमा, ब्राह्मण ब्रह्मायु वृद्ध, जराजर्जर आहे, त्याचे वय झाले आहे, आपल्या आयुष्याचा मोठा भाग त्याने व्यतीत केला आहे आणि त्याचा अंत जवळ आला आहे. त्याचे वय एकशेवीस वर्षांचे आहे. तो तीन वेदांत पारंगत आहे. वैदिक पदांचे अर्थ आणि कर्मकांडाचे नियम ह्यांचे त्याला चांगले ज्ञान आहे. वर्णांचे शुद्ध उच्चार करण्याचे शास्त्र, वाक्यांच्या अर्थाचे विवरण करण्याचे शास्त्र आणि पाचवे म्हणजे इतिहास ह्यात तो प्रवीण आहे. वेदांचा पदपाठ, व्याकरण, लोकांत रूढ असलेले तत्त्वज्ञान, तसेच महापुरुषाची लक्षणे ओळखणे ह्या विद्या त्याला पूर्णपणे अवगत आहेत. महोदय, मिथिलेत जे ब्राह्मण आणि गृहस्थ राहातात त्यांच्यांत ब्राह्मण ब्रह्मायु हा संपन्नतेच्या बाबतीत सर्वांत प्रथम म्हणून ओळखला जातो; मंत्रविद्येत सर्वांत प्रथम म्हणून ओळखला जातो; वयाने आणि कीर्तीने प्रथम म्हणून ओळखला जातो. आदरणीय गौतमाला भेटावे अशी त्याची इच्छा आहे.' "

"जसा आपला आदेश, महोदय" असे म्हणून त्या ब्राह्मण तरुणाने ब्रह्मायूची आज्ञा स्वीकारली आणि तो भगवंतांकडे गेला. त्यांच्याकडे गेल्यावर त्याने भगवंतांना कुशल विचारले, त्यांच्याशी प्रेमादराने संभाषण केले आणि तो एका बाजूला उभा राहिला. आदराने अंतरावर उभा राहिला असताना तो भगवंतांना म्हणाला, "हे गौतमा, ब्रह्मायु ब्राह्मणाने आपल्याला असे विचारले आहे की, आपली प्रकृती चांगली आहे ना?... (वरील परिच्छेदाप्रमाणे) ... मिथिलेत जे ब्राह्मण आणि गृहस्थ राहातात त्यांच्यांत ... (ब्रह्मायु)... वयाने व कीर्तीने प्रथम म्हणून ओळखला जातो.... इ. हे आदरणीय गौतमा, आपल्याला भेटावे अशी त्याची इच्छा आहे."

"ब्रह्मायु ब्राह्मणाला जे करायचे आहे ते करण्याची योग्य वेळ आली असे जेव्हा त्याला वाटेल तेव्हा त्याने ते करावे."

मग तो ब्राह्मण तरुण ब्रह्मायूकडे गेला; आणि तेथे गेल्यावर तो ब्रह्मायू ब्राह्मणाला म्हणाला, "महोदय, श्रमण गौतमाने आपल्याला अनुज्ञा दिली आहे. महोदय, आता आपल्याला जे करायचे आहे ते करण्याची योग्य वेळ आली आहे असे जेव्हा आपल्याला वाटेल तेव्हा आपण ते करावे."

९. मग तो ब्राह्मण ब्रह्मायु भगवंतांकडे गेला. तेथील परिषदेने (भिक्षुसंघाने) त्याला येताना दुरून पाहिले. त्याला पाहिल्यावर ते सर्व उभे राहिले, प्रत्येकजण त्याला जागा देण्यासाठी काहीसा बाजूला सरला; कारण तो प्रसिद्ध आणि विख्यात होता. मग तो ब्राह्मण ब्रह्मायु परिषदेला म्हणाला, "असे नको. आपण आपापल्या आसनावर बसावे; मी येथे श्रमण गौतमाशेजारी बसतो." मग तो ब्राह्मण ब्रह्मायु भगवंतांजवळ गेला; त्यांच्याजवळ गेल्यानंतर त्याने भगवंतांना त्यांचे कुशल विचारले. त्यांच्याशी प्रेमादरपूर्वक संभाषण करून तो मर्यादेने काही अंतरावर बसला. आदराने असा अंतरावर बसला असताना त्या ब्राह्मण ब्रह्मायूने भगवंतांच्या शरीरावर महापुरुषाची बत्तीस लक्षणे दिसतात का हे न्याहाळून पाहिले.

आणि ब्राह्मण ब्रह्मायूने भगवंतांच्या शरीरावर दोन सोडली तर (इतर) सर्व लक्षणे पाहिली. महापुरुषाच्या ह्या दोन लक्षणांविषयी तो संशयात, घोटाळ्यात पडला; त्यांच्याविषयी तो अनिश्चित, असमाधानी होता – जे वस्त्राने झाकलेले असते त्याच्यावर कोशाचे आवरण आहे का? आणि जिव्हा दीर्घ आहे का? मग तो ब्राह्मण ब्रह्मायु भगवंतांना उद्देशून गाथेत म्हणाला,

*"महापुरुषाची जी बत्तीस लक्षणे मी ऐकलेली आहेत,*
*"त्यांतील दोन, गौतमा, तुझ्या शरीरावर मला दिसत नाहीत.*
*"जे वस्त्राने झाकलेले असते ते, नरोत्तमा, कोशावृत आहे का?*
*"की नारीसमान आहे? जिव्हा ऱ्हस्व आहे का? की दीर्घ आहे?*
*"हा प्रश्न मला पडतो. हे मला समजून यावे यासाठी जिव्हा बाहेर काढ; माझी शंका, हे मुने, तू दूर कर.*
*"आता आणि येथे हित साधले जावे आणि पुढे सुख प्राप्त व्हावे म्हणून जे (जाणण्याची) इच्छा आम्हाला आहे, ते (पाहण्याची) अनुज्ञा व्हावी."*

१०. मग भगवंतांच्या मनात आले की, ह्या ब्राह्मण ब्रह्मायूला माझ्या शरीरावर महापुरुषाची, दोन सोडून, बत्तीस लक्षणे दिसत आहेत. महापुरुषाच्या ह्या दोन लक्षणांविषयी त्याला शंका आहे, तो घोटाळ्यात पडला आहे, अनिश्चित, असमाधानी आहे – जे वस्त्रावगुंठित असते ते कोषवेष्टित आहे की नाही आणि जीभ लांब आहे की नाही. मग भगवंतांनी त्या ब्राह्मण ब्रह्मायूला अशी अतींद्रिय शक्ती दिली की भगवंतांनी जे वस्त्राने झाकले होते ते कोशवेष्टित आहे हे त्याला दिसले. मग भगवंतांनी जिव्हा बाहेर काढली आणि तिने आपल्या दोन्ही कानांना, दोन्ही नाकपुड्यांना मागे आणि पुढे थोपटले आणि आपले सबंध कपाळ आपल्या जिभेने त्यांनी झाकले.

मग भगवंतांनी ब्राह्मण ब्रह्मायूला गाथेत प्रतिसाद दिला:
*"महापुरुषाची जी बत्तीस लक्षणे तुम्ही ऐकली आहेत*
*"ती सर्व माझ्या शरीरावर आहेत; ब्राह्मणा, तू साशंक राहू नकोस. ज्याचे ज्ञान प्राप्त करून घ्यावे असे जे आहे, त्याचे ज्ञान मी मिळविले आहे;*
*"जे स्वतःमध्ये विकसित करावे असे आहे ते विकसित केले आहे.*
*"(स्वतःमधील) जे सोडून द्यावे असे आहे ते मी सोडून दिले आहे.*
*"म्हणून ब्राह्मणा, मी बुद्ध आहे.*
*"आता आणि येथे हित साधले जावे आणि पुढे सुख प्राप्त व्हावे म्हणून जे जाणण्याची तू इच्छा करतोस ते पाहण्याची अनुज्ञा माग."*

११. मग त्या ब्राह्मण ब्रह्मायूच्या मनात आले, 'श्रमण गौतमाने मला अनुज्ञा दिली आहे. समजा, आता आणि येथे (इहलोकात) जे साधायचे असते त्याच्याविषयी आणि भावी स्थितीत (परलोकात) साधायचे असते त्याच्याविषयी त्याला विचारले तर?' पण मग त्या ब्राह्मण ब्रह्मायूच्या मनात असा विचार आला, 'इहलोकात जे साधायचे असते त्याच्या बाबतीत मी कुशल आहे. इहलोकात जे साधायचे असते त्याच्याविषयी मला लोक प्रश्न विचारतात. तेव्हा, समजा, मी श्रमण गौतमाला केवळ भावी स्थितीत जे साधायचे असते त्याच्याविषयी प्रश्न विचारले तर?' मग ब्राह्मण ब्रह्मायूने भगवंतांना उद्देशून पुढील गाथा म्हटल्या :

*"एखादा ब्राह्मण कसा होतो? एखादा ज्ञानी कसा होतो?*
*"एखादा त्रैविद्य[३] कसा होतो? ज्ञानी कुणाला म्हणतात?*
*"कुणी अर्हत् कसा होतो, कैवल्यावस्था कशी प्राप्त होते?*
*"कुणी मुनी कसा होतो? बुद्ध कुणाला म्हणतात?"*

१२. मग भगवंतांनी ब्राह्मण ब्रह्मायूला गाथांतच प्रतिसाद दिला :

*"पूर्वीची (आपली) निवासस्थाने जो जाणतो, स्वर्ग आणि दुःखदायक मार्गांचे अवलोकन जो करतो,*
*"ज्याने श्रेष्ठ ज्ञान प्राप्त करून जन्माचा क्षय केला आहे, तो मुनी असतो.*
*"आपले चित्त शुद्ध आहे, सर्व रागद्वेषांपासून मुक्त आहे हे जो जाणतो,*
*"जन्ममरणापासून ज्याची सुटका झाली आहे, जो ब्रह्मचारी, केवली आहे*
*"सर्व धम्मांच्या (मानसिक अवस्थांच्या) पलीकडे जो गेला आहे त्याला बुद्ध म्हणतात."*

हे घडल्यानंतर तो ब्राह्मण ब्रह्मायू आपल्या आसनावरून उठला, आपले उत्तरीय त्याने सावरले, आणि भगवंतांच्या पायांवर आपले मस्तक नमवून त्याने त्या पायांचे सभोवार





चुंबन घेतले आणि त्यांचे सभोवार संवाहन केले. आणि त्यांना आपले नाव सांगितले. "हे गौतमा, मी व्रह्मायु ब्राह्मण आहे. मी ब्रह्मायु ब्राह्मण आहे." मग ती परिषद आश्चर्याने स्तंभित झाल्यासारखी म्हणाली, "पाहा! हे किती आश्चर्यकारक, किती अद्‌भुत आहे! ह्या श्रमणाची अतींद्रिय शक्ती आणि थोरवी इतकी श्रेष्ठ आहे की, तिच्यामुळे ब्राह्मण ब्रह्मायु त्याला अशा रीतीने अतिशय पूज्य भावनेने नमन करीत आहे." मग भगवंत ब्रह्मायु ब्राह्मणाला असे म्हणाले, "ब्राह्मणा, आता पुरे झाले. तुझे चित्त माझ्यावर इतके प्रसन्न झाले आहे तर आता ऊठ आणि आपल्या आसनावर वस." मग तो व्रह्मायु ब्राह्मण उठला आणि आपल्या आसनावर वसला.

१३. मग भगवंतांनी त्या व्रह्मायु ब्राह्मणाला अनेक विषयांवर प्रवचन दिले –दानाविषयीचे प्रवचन, शीलाविषयीचे प्रवचन, स्वर्गाविषयीचे प्रवचन; इंद्रियसुखांत जी संकटे असतात, निष्फलता, विकृती असते त्यांचा त्याग केल्याने जो लाभ होतो त्याचे विवरण त्यांनी केले. मग भगवंतांना समजले की, व्रह्मायु ब्राह्मणाचे चित्त (अंतिम सत्याचे ग्रहण करण्यासाठी) सिद्ध आहे, मृदू आहे, (निर्वाणपथात येणाऱ्या) विघ्नांपासून मुक्त आहे, उन्नत आहे, प्रसन्न आहे. मग जे धम्म (जी सत्ये) बुद्धांनी स्वतः शोधून काढले आहेत त्यांचा भगवंतांनी व्रह्मायूला उपदेश केला – दुःख, दुःखाचा उदय, दुःखाचे संपूर्ण निरसन आणि (ते साधण्याचा) मार्ग. ज्याप्रमाणे न डागळलेले स्वच्छ कापड सहजपणे रंग धारण करते त्याप्रमाणे आसनावर बसलेला असतानाच त्या ब्राह्मण ब्रह्मायूमध्ये सर्व रजःकणांपासून शुद्ध, निर्मळ अशी धर्मदृष्टी उदयाला आली. "ज्या कशाचा अस्तित्वात येणे हा धर्म असतो (वैशिष्ट्य असते) त्या साऱ्यांचा विलयाला जाणे हाही धर्म असतो." त्या व्रह्मायु ब्राह्मणाला धम्माचे दर्शन झाले, त्याने धम्म प्राप्त करून घेतला, धम्माचे ज्ञान त्याला झाले, त्याने धम्मात अवगाहन केले, तो संशयाच्या पार पलीकडे पोचला, अनिश्चिततेपासून तो विमुक्त झाला आणि इतर कुणाचे साहाय्य न घेता गुरूच्या उपदेशावर त्याचा पूर्ण विश्वास बसला. तो भगवंतांना म्हणाला, "हे गौतमा, हे उत्कृष्ट आहे; किती उत्कृष्ट आहे हे, गौतमा! जे कोलमडून पडले असेल जे एखाद्याने नीट उभे करावे, जे झाकलेले असेल ते उघड करावे, गोंधळलेल्याला मार्ग दाखवून द्यावा, दृष्टी असलेल्या लोकांना रूपे दिसावीत म्हणून अंधारात तैलदीप आणावा त्याप्रमाणे पूज्य गौतमाने अनेक परीने धम्म प्रकाशित केला आहे. तेव्हा मी पूज्य गौतमाला, धम्माला आणि संघाला शरण जात आहे. आतापासून आमरण पूज्य गौतमाला मी जो शरण आलो आहे त्या माझा त्याने स्वीकार करावा. आणि पूज्य गौतमाने भिक्षुसंघासह उद्या माझ्याकडे भोजनाला यावे."

भगवंतांनी स्तब्ध राहून संमती दर्शविली. मग त्या ब्राह्मण ब्रह्मायूने भगवंतांची अनुमती आहे हे जाणले. तो आपल्या आसनावरून उठला, भगवंतांना त्याने अभिवादन केले आणि त्यांना प्रदक्षिणा घालून तो तिथून निघाला. मग ब्राह्मण ब्रह्मायूने आपल्या घरी उत्तररात्री कठीण आणि मृदु असे स्वादिष्ट अन्न शिजविले आणि भगवंतांना भोजनाची वेळ झाली असे त्याने सांगितले : "पूज्य गौतमा, भोजनाची वेळ झाली आहे, स्वयंपाक सिद्ध आहे." मग भगवंतांनी सकाळी चीवर परिधान केले आणि पात्र व चीवर सोबत घेऊन ते ब्राह्मण ब्रह्मायूच्या गृहाकडे गेले. आणि तेथे गेल्यावर आपल्यासाठी तयार ठेवलेल्या आसनावर, भिक्षुसंघासमवेत ते बसले. मग त्या ब्राह्मण ब्रह्मायूने सात दिवस, स्वतःच्या हातांनी, बुद्ध ज्याचे प्रमुख होते अशा त्या भिक्षुसंघाला कठीण आणि मृदु असे स्वादिष्ट अन्न वाढले. मग सात दिवस उलटल्यावर भगवंत विदेहात भ्रमण करायला निघाले.

भगवंत तेथून निघाल्यानंतर, फार दिवस उलटले नसताना, ब्रह्मायु कालवश झाला. मग काही भिक्षू भगवंतांकडे गेले. त्यांच्याकडे गेल्यावर त्यांनी भगवंतांना अभिवादन केले; आणि ते आदराने अंतर सोडून बसले. असे अंतर सोडून ते बसले असताना ते भिक्षू भगवंतांना म्हणाले, "भन्ते, ब्राह्मण ब्रह्मायूचे निधन झाले आहे, त्याला कोणती गती मिळाली? त्याच्या भविष्यात काय आहे?"

"भिक्षूंनो, ब्राह्मण ब्रह्मायु पंडित होता. त्याने धम्माचे, धम्माच्या विविध भागांचे पालन केले. धम्माविषयी चर्चा करून त्याने मला त्रस्त केले नाही. भिक्षूंनो, माणसाला ह्या खालच्या तीराला (इहलोकाला) जखडणाऱ्या पाच बंधनांचा[४] ब्रह्मायूने पूर्ण नाश केला आहे; स्वयंप्रेरणेने त्याचे उत्थान झाले आहे. तेथे त्याला निर्वाण प्राप्त होईल. तो ह्या लोकी परतणार नाही." असे भगवंत म्हणाले. प्रमुदित झालेले ते भिक्षू भगवंतांच्या ह्या वोलण्याने आनंदित झाले.

**टिपा :**

१. मूळात 'चक्क-रतन' : हे चक्र म्हणजे सूर्यबिंब होय. महासुदस्सन सुत्तात (दीघ–निकाय) ह्या 'रतना'विषयी अधिक माहिती मिळते. महासुदस्सन राजाला पौर्णिमेच्या रात्री हे दिव्य चक्र दिसते. ज्या राजाला हे चक्र पौर्णिमेच्या रात्री दिसते तो चक्रवर्ती राजा होतो. महासुदस्सन त्या चक्राची पूजा करतो. ते पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर ह्या सर्व दिशांना फिरते. ह्या सर्व दिशांचे राजे महासुदस्सनराजाला शरण येतात. तो त्यांना धर्माप्रमाणे वागण्याचा आदेश देतो. अखेरीस हे चक्र राजप्रासादात स्थिरावते.

२. अष्टविध अन्न : "भोज्य, पेय, चोष्य, लेह्य, खाद्य, चर्व्य, निःपेय (खीर, कण्हेरी इ.), भक्ष्य (आपटे कोश)" – *संकेत-कोश*, संपादक श्री. शा. हणमंते, आवृत्ती दुसरी, पृ. २२५

३. त्रैविद्य (तेविज्ज) : ".... 'तेविज्ज' (संस्कृत : त्रैविद्य) ह्याचा अर्थ एकतर तीन वेदांचे ज्ञान असा आहे, किंवा विशेषण म्हणून (हा शब्द वापरला तर) त्याचा अर्थ हे ज्ञान ज्याला आहे असा ब्राह्मण, असा आहे.... हे ज्ञान ज्यांना नव्हते असे अनेक ब्राह्मण असल्यामुळे ज्यांना विशेष ज्ञान आहे अशा आदरणीय व्यक्तींना उद्देशून हा शब्द स्वाभाविकपणे वापरण्यात येऊ लागला; आदरभाव व्यक्त करणारे विरुद असे ह्या शब्दाचे स्वरूप बनले. बौद्ध लिखाणात अर्हतांचे विशेषण म्हणून हा शब्द टिकून राहिला. पण त्याचा अर्थ "त्रिविध बौद्ध सिद्धांतांचे ज्ञान ज्याला आहे तो" असा झाला – अनित्यतावाद, दुःख आणि अनात्मवाद असा हा त्रिविध सिद्धान्त आहे. म्हणजे असे की, वेदांच्या ज्ञानाची जागा, ज्या फसव्या आणि विनाशी वस्तूंनी आपण घेरलेलो आहोत आणि आपण स्वतःच ज्या वस्तूतील एक आहोत, त्यांच्या खऱ्या स्वरूपाच्या ज्ञानाने घेतली." (*Buddhist Suttas* - T.W. Rhys Davids, १९६५ पृ. १६१-१६२).

४. ही पाच बंधने म्हणजे (१) सक्कायदिट्ठी (विशिष्ट असा, इतरांपासून भिन्न असलेला असा आत्मा आहे अशी दृष्टी); (२) विचिकिच्छा (संशय, अनिश्चितता); (३) सीलव्वतपरामासो (केवळ यम-नियमांच्या पालनाच्या अधीन होणे, हे पुरेसे आहे असे मत स्वीकारणे); (४) कामच्छन्दो (इन्द्रियसुखांची लालसा); (५) व्यापादो (अपाय करणे, अपाय करण्याची इच्छा बाळगणे).



## लेखक परिचय

❖ **दे.अ. दाभोलकर** : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक; आर्थिक विकास, गांधी विचार, शिक्षण, समाज परिवर्तन इत्यादी विषयांवर मौलिक चिंतन; पुणे विद्यापीठ व इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे, यांचे भूतपूर्व संचालक; *आर्थिक विकासाचा प्रश्न, लोकशाही समाजवाद, शिक्षणाची समान संधी* इत्यादी पुस्तिका व नियतकालिकांमधून अनेकविध विषयांवर लेखन; क्रियाशील विचारवंत; **पत्ता** : ४३ गुरुकृपा हाऊसिंग सोसायटी, गोडोली, सातारा.

❖ **मु.ब. शहा** : हिंदी विषयाचे प्राध्यापक; राष्ट्र सेवा दल, छात्र भारती, आंतरभारती इत्यादी लोकशाही समाजवादी व सांस्कृतिक चळवळींमध्ये सक्रिय सहभाग; का.स. वाणी प्रगत मराठी अभ्यास संस्था, इतिहासाचार्य राजवाडे संशोधन मंदिर इत्यादी संस्थांच्या कार्यात सहभाग; अमृता प्रीतम यांच्या 'रसीदी टिकट'चे मराठी भाषांतर, व इतर लेखन. **पत्ता** : प्राध्यापक कॉलनी, देवपूर, धुळे.

❖ **आ.ना. पेडणेकर** : इंग्रजीचे निवृत्त प्राध्यापक; लघुकथाकार, कवी व समीक्षक; टॉलस्टॉय यांच्या *वॉर अँड पीस* या अक्षर वाङ्मयकृतीचे संक्षिप्त भाषांतर *युद्ध आणि शांती* प्रसिद्ध. **पत्ता** : ६ अनुपमप्रभा, अमरसी रोड, मालाड (प.), मुंबई ४०० ०६४.

❖ **सुलोचना वाणी** : राष्ट्र सेवा दलामध्ये व्यक्तित्वाची जडणघडण; स्त्रियांची स्थिती, स्त्रियांचे प्रश्न यांच्या आस्थेवाईक अभ्यासक-कार्यकर्त्या. **पत्ता** : स्नेह, १४ महेशनगर, पिंपरी, पुणे.

❖ **रा.ग. जाधव** : मराठीचे माजी प्राध्यापक; मराठी विश्वकोशाचे निवृत्त विभाग संपादक; *साहित्य व सामाजिक संघर्ष, निळी पहाट, साठोत्तरी मराठी कविता व कवी, पर्यावरणीय प्रबोधन व साहित्य* इत्यादी समीक्षापर तीस पुस्तके प्रकाशित. **पत्ता** : ११८० सदाशिव पेठ, अनपट वाडा, पुणे ४११ ०३०.

❖ **प्रभाकर नानावटी** : केंद्र सरकारच्या आर्मामेंट रिसर्च प्रयोगशाळेत नोकरी; बुद्धिप्रामाण्यवादी, विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनामधून राजकीय-सामाजिक घडामोडींविषयी चिंतन व वृत्तपत्रीय लेखन. **पत्ता** : आर्मामेंट कॉलनी, औंध, पुणे ४११ ००७.

वाद-संवाद

# ४२चा लढा

४२च्या लढ्याच्या संदर्भात जानेवारी ९९ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या माझ्या पत्रावर श्री. वसंत पळशीकर यांचे टिपण मे ९९ च्या अंकात आहे.

मुख्य प्रश्न युद्धस्थिती, त्याचे वाचन आणि ४२चा लढा यांच्या परस्पर संबंधाचा आहे. इथे श्री. पळशीकरांनी दोन प्रश्न उभे केले आहेत.

१) युद्धाचे पारडे फिरले हे आज सर्व माहिती उपलब्ध झाल्यावर मांडणे निराळे. जून ४२ मध्ये तसे म्हणता आले असते का?

२) युद्ध खेळणाऱ्या नेत्यांची, सेनाधिकाऱ्यांची व भारतातल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची बोधना (Perception) काय होती?

इथे मी आणखी एका प्रश्नाची भर टाकू इच्छितो. प्रश्न असा :

३) गुप्त माहिती मिळवण्याचा प्रयत्न कदाचित गांधीजींना मान्य झाला नसता. तेव्हा जी माहिती उघड होती, वर्तमानपत्रांत वा नकाशात उपलब्ध होती तिचा योग्य अन्वयार्थ लावण्याची तयारी, तसा अभ्यास नेतृत्वाने केला होता का? हे स्वतःला शक्य नसले तर तशी माणसे हुडकून त्यांचे म्हणणे समजून घेणे, ते राजकारणाच्या गणितात समाविष्ट करणे असा काही प्रयत्न झाला का?

मला जाणवतात ती उत्तरे अशी :

१) युद्धाचे पारडे फिरले हे जून ४२, निदान जुलै ४२ पर्यंत उपलब्ध उघड माहितीवरून (तत्कालीन) स्पष्ट आहे. जून ४१ ला रशिया युद्धात ओढला जाणे, मॉस्कोच्या वेशीवरून जर्मनीला माघार घ्यावी लागणे, डिसेंबर ४१ ला अमेरिका दोस्त राष्ट्रांच्या बाजूने युद्धात ओढली जाणे, पर्ल हार्बरवर केल्या गेलेल्या अनपेक्षित हल्ल्यात जबर हानी जरी स्वीकारावी लागली तरी 'मिडवे'च्या नाविक युद्धात जपानी नौदलाचे कंबरडे (विमानवाहू नौका) मोडले जाणे, सुवेझ कालव्यापलीकडे जर्मनीला रोखणे या सर्व घटना उघड होत्या. त्या ८ ऑगस्ट ४२ पूर्वीच्या आहेत.

पण ४२चा लढा हा मुख्यतः जपानच्या संदर्भात पाहायला हवा. डिसेंबर ४१ ला पर्ल हार्बरचा अमेरिकन लष्करी नाविक तळच उद्ध्वस्त केला असे नव्हे, तर ब्रिटिशांच्या पूर्वेकडील साम्राज्याचे लचके तोडीत जपानने सहा महिन्यांत ब्रह्मदेशपर्यंत धडक मारली. ब्रह्मदेशचा पश्चिम किनारा बंगालच्या उपसागराला लागून आहे. तिथली अंदमान बेटे जपानी ताब्यात गेली. असे असताना ही मोहीम पुढे चालवत जपानने बंगाल, ओरिसा, आंध्र, मद्रास, सिलोन (श्रीलंका) या भागात मुसंडी का मारली नाही? दुसरा मार्ग आराकानमधून आसाममध्ये घुसण्याचा होता. तेही जपानने केले नाही. याची कारणे उघड आहेत. ब्रह्मदेशमधून आराकानमार्गे मोठी मोहीम शक्य नव्हती. कारण तीन पायवाटा सोडल्या तर रस्ते-रूळमार्ग नव्हते. उलट भारतात दिमापूरपर्यंत रूळमार्ग होता, रस्ताही होता. तेव्हा रसद, दारूगोळा, अवघड शस्त्रे सीमेपर्यंत नेणे ब्रिटिशांना सहज शक्य होते. यातून फक्त पायदळाची मोहीम जपानी सैन्याला शक्य झाली असती. जर नाविक सामर्थ्याच्या जोरावर भारताच्या पूर्व किनाऱ्यावर (श्रीलंका धरून) उतरता आले असते तरच आराकानमधून पायदळ घुसवणे युद्धदृष्ट्या फायद्याचे होते. 'मिडवे'च्या लढाईत नौदलाचे कंबरडे मोडल्याने जपानची मुख्य भूमी उघडी पडते तोपर्यंत जिंकलेला मुलूख हातातून जाण्याची वेळ आली होती. म्हणून नौदल वापरणे शक्य नव्हते.

वरील युद्धस्थिती असताना जपानचा पराभव होण्यास पुढची तीन वर्षे का लागली? असा प्रश्न मग विचारता येईल. डिसेंबर ४१ ला अमेरिका महायुद्धात ओढली गेल्यावर जर्मनी-जपान या जोडगोळीत (इटलीला फार महत्त्व कुणीच देत नव्हते) जर्मनीचा पराभव प्रथम, मग जपान असे युद्धधोरण चर्चिल-रुझवेल्ट यांनी ठरवले होते. त्यामुळे जपान आणखी पुढे येणार नाही इतकी शक्ती पूर्वेकडे ठेवत सर्व प्रयत्न जर्मनीविरुद्ध एकवटण्यात आले. हे धोरण अर्थातच वर्तमान-पत्रांतून घोषित करण्यात आले नव्हते. पण वरिष्ठ सेना व नागरी अधिकारी यांना माहीत होते.






२) युद्ध खेळणारे नेते, सेनाधिकारी व भारतातले वरिष्ठ अधिकारी यांची बोधना काय असेल हे वरच्या मुद्यावरून उघड आहे. जर जपानने प्रयत्न केलाच तर काही अंशी लढत माघार, तोपर्यंत कुमक येणे अशी ही रणनीती आहे. माघारीच्या वेळी दग्धभू धोरण सर्वच राष्ट्रे अंगिकारतात. तेव्हा तशा योजनेचे प्रारूप प्रसृत झाले असणार. पण तसा निर्णय झाला नव्हता; 'मिडवे' नंतर ती शक्यताही नव्हती.

३) आमच्या नेतृत्वात युद्धरणनीतीशास्त्र समजून घेणारा, निदान स्वतःच्या प्रभावळीत तशी मंडळी जोपासणारा कुणीही नेता नव्हता. तेव्हा, जिथे तसा प्रयत्नच नव्हता तिथे बोधना चुकीच्या गृहितांवर करून घेतली जावी हे अपरिहार्य होते. ४२चा लढा तर सोडाच पण काश्मीर (१९४८), चीन (१९६२), पाकिस्तान (१९६०), बांगला देश (१९७१), कारगिल (१९९९) या सर्व युद्ध-प्रसंगी राजकीय-प्रशासनिक नेतृत्वाची ही कच्ची बाजू पुरेशी उघड झाली आहे. यात दोष फक्त राजकारण्यांचा आहे असे नव्हे. भूगोल-व्यूहरचना, त्यावर संबंधित राजकारण, सैन्यतयारी हे आपल्या मानसिकतेतच नाही. आडात नसताना पोहोऱ्यात कुठून येणार?

गांधीजींना युद्धाच्या सर्व आघाड्यांवरील नेमकी स्थिती माहीत नव्हती; जागेवरच्या हालचाली, त्यामागील योजना-भूमिका हा निर्णायक पुरावा त्यांच्यासमोर होता असे श्री. पळशीकर म्हणतात. ४२चा लढा छेडायचा का नाही हा नाजूक पण कळीचा प्रश्न होता. 'युद्धाच्या सर्व आघाड्यांवरील नेमकी स्थिती' चर्चिल, रुझवेल्ट, हिटलर, स्टॅलिन, टोजो यांनाही कळणे शक्य नव्हते. उपलब्ध माहिती ही मर्यादा असतेच. अशी उपलब्ध माहिती व तिचे विश्लेषण यासाठी तयारी करण्यासाठी वेळ मिळाला असूनही ती न केल्याने, तसा कलच नसल्याने चुकीचे निष्कर्ष निघणे अपरिहार्य होते.

तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो यांच्याबरोबर गांधीजींचे संबंध – 'गांधीजींच्या बाजूने तरी' – विशेष आत्मीय व विश्वासाचे होते असे गांधीजींनी व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रांवरून जाणवते असे श्री. पळशीकर लिहितात. एकतर लिहिलेली पत्रे हे अशा खास संबंधांचे माप असू शकेल का, असा प्रश्न उद्‌भवतो. दुसरे म्हणजे, आधी 'गांधीजींच्या बाजूने तरी' असे म्हटल्यावर (एकतर्फी) लगेचच पुढच्या वाक्यात हे संबंध 'उभयतातील सामंजस्य व परस्परविश्वास' या पातळीवरचे ठरण्याची बोधना कशी होते हे कळणे अवघड आहे. तिसरे म्हणजे, लॉर्ड लिनलिथगो हे ब्रिटनचे भारतातले सर्वोच्च अधिकारी. ब्रिटिश मंत्रिमंडळ जे धोरण ठरवेल त्याची अंमलबजावणी करणे हे त्यांचे काम. त्यांचे राष्ट्र एका जीवघेण्या युद्धात गुंतलेले. अशा परिस्थितीत या स्थानावरच्या व्यक्तीस धोरणाबाहेर हालचालीस फार कमी वाव असतो. सर्व ब्रिटिश अधिकारी एका साच्याप्रमाणे वागणार नाहीत, त्यांचे व्यक्तिगत कल असणार यात वाद नाही. पण अशा फार मर्यादित वाव असणाऱ्या अवकाशात (स्पेस) काही 'परस्परविश्वास संबंध' असलेच तर बाजूला सारले जातात. तसे न केल्यास ती व्यक्ती बाजूला सारली जाते हा राजकीय व्यवहार गांधीजींना माहीत नव्हता असे म्हणणे त्यांच्यावर अन्यायाचे होईल. ४२ चा लढा पुकारण्याच्या आधी व्हाइसरॉयनी मीराबेन यांना भेट न देता दुय्यम अधिकाऱ्याला भेटण्यास सांगितले या वस्तुस्थितीवरून हा तथाकथित 'परस्परविश्वास' लिखाणातला औपचारिकपणा वा मुत्सद्दीपणा आहे हे जाणवते. जर असा परस्परविश्वास असता तर जूनमध्ये वर्किंग कमिटीत लढ्याचा निर्णय ठरण्याआधी, निदान निर्णय ठरल्यावर ऑगस्टमध्ये 'भारत छोडो'ची घोषणा देण्याआधी व्हाईसरॉयच्या भेटीचा प्रयत्न गांधीजींनी केला का, नसल्यास का नाही, केला असल्यास भेट का झाली नाही अशी प्रश्नमालिका उभी राहते. लढा जाहीर करायचा, 'करा वा मरा', 'छोडो भारत' अशा घोषणा दिल्यावर मग व्हॉइसरॉयची भेट मागून त्याआधारे मग कार्यक्रम ठरवू असे म्हणायचे, आणि यात काहीतरी उच्चतर कोटीतली नैतिकता होती, ती ब्रिटिशांना समजलीच नाही असे म्हणायचे, हे तर्कशास्त्र समजणे जरा अवघड आहे.

गांधीजी अराजकतावादी नव्हते, असणे शक्य नव्हते. त्यामुळे राज्य निर्नायकी सोडून ब्रिटिशांनी पलायन करणे त्यांना मान्य नव्हते, प्रजा उघड्यावर पडू देण्याची कल्पना सहन करण्यासारखी नव्हती यात वाद नाही. अशी परिस्थिती उभी राहिली आहे हे निदानच मुळात चूक होते असा मुद्दा आहे. शिवाय ही चूक तत्कालीन उपलब्ध माहितीचे नीट विश्लेषण न करणे, तशी यंत्रणाच उभी केलेली नसणे यातून घडलेली आहे. गांधीजींना व्यक्तिशः जबाबदार धरण्याचा मुद्दा नाही. नेतृत्वफळीत कुणीच ही अभ्यासाची मानसिकता जोपासली नव्हती. आजही ती फार तुरळकच आहे. याची फार मोठी किंमत स्वतंत्र भारताने मोजली आहे.

कसा का असेना निर्णय झाला. आता लढ्याचे स्वरूप

अनुक्रमणिका

वरिष्ठ नेतृत्व फळी, दुय्यम फळी असे स्तर ओलांडत अनुयायी, कार्यकर्ते, जनता इथपर्यंत पोहोचवणे हे पुढचे पाऊल. गांधीजी अतिशय सोप्या भाषेत बोलत व लिहीत. पंडित नेहरूंच्या भाषेचा काव्यमय डौल गांधीजींच्या भाषेत नव्हता. असे सोपे लिहिणे फार अवघड असते. अनेक मान्यवर लेखकांनी गांधीजींसारखे सोपे लिहिणे जमायला हवे असे म्हटले आहे. गांधीजी आठ ऑगस्टआधी तुरुंगात नव्हते, एक साप्ताहिक त्यांच्या हातात होते. देशाच्या बहुतेक सर्व भागांत सहकारी पसरलेले होते. या सर्व गोष्टींचा वापर करून आपल्या संकल्पित लढ्याचे स्वरूप कानाकोपऱ्यात पोहोचवण्याचा प्रयत्न जून (वर्किंग कमिटी निर्णय) ते आठ ऑगस्ट या काळात कितीसा झाला? इतके सोपे बोलू-लिहू शकणारा, जनतेवर असामान्य पकड असलेला, विशाल पक्षसंघटना हाताशी असलेला, व्हाइसरॉयशी 'विश्वासपूर्ण' संबंध असलेला, हातातली पाने समोर ठेवून राजकारण करणारा – अशा व्यक्तीचे विचार त्याच्याच निकटच्या सहकाऱ्यांना, अनुयायांना तेव्हा समजले नाहीत; ब्रिटिशांची गोष्ट तर फार दूरची. असे काही विचार-कृती कार्यक्रम होते हे आजही वरेचसे तर्काधारे मांडावे लागते आहे, अर्थ बसवावा लागतो आहे. त्यामुळे मुळात असे काही खरेच होते का, असा प्रश्न पडतो. हिंसक मार्गाचा अवलंब करणाऱ्या अनुयायांना सौम्य समज, तर असे प्रयत्न तशाच हिंसक मार्गाने चिरडणाऱ्यांचे त्वेषाने खंडन हे नेत्याच्या भूमिकेतून योग्यच आहे. यात अनुयायांबद्दल ममत्व आहे, ते असायलाच हवे. पण मग ते 'उच्च नैतिक पातळीवरून अत्यंत सर्जनशील विधायक राजकारणात' बसते का?

४२ च्या लढ्याच्या संबंधात आणखी काही मुद्दे जाणवतात :

१) सुभाषबाबू दुसऱ्यांदा काँग्रेस अध्यक्ष निवडून आले ते गांधीजींचा विरोध असताना. अती ताणण्यात पक्ष उभा फुटण्याचा धोका होता. हा सुभाषबाबूंच्या मागे जाणारा गट काँग्रेसअंतर्गत डाव्यांचा होता. त्यातल्या बऱ्याच जणांनी सशस्त्र लढ्याची शक्य होती तेवढी तयारी केली होती. जर ब्रिटिशविरोधी लढा काँग्रेसने पुकारला नसता तर ही मंडळी आणखी किती दिवस स्वस्थ बसणार होती? आज ना उद्या त्यांनी सुरुवात केलीच असती. सशस्त्र लढ्याची तयारी केल्यावर फार काळ वाट पाहता येत नाही; तयारी उघडी पडण्याचा संभव असतो. जर गांधीजींनी लढा पुकारला तर अशा छुप्या सशस्त्र लढ्याला जनतेतून जास्त प्रमाणात साथ मिळेल म्हणून वाट पाहिली गेली असेल. पण ही मर्यादा संपत आलेली नेतृत्वाला जाणवली असणार. त्यामुळे पाऊल उचलणे आवश्यक वाटले असावे. नाहीतर पक्ष दुर्बल झाला असता. अशा परिस्थितीतला कार्यक्रम ब्रिटिशविरोधी घोषणांवरच उभा राहू शकत होता. हे झाले नसते तर नेतृत्व बाजूला सारले जाण्याचाही धोका होता. गांधीजींच्या मानसिकतेत नेतृत्व हातातून जाणे याला फार महत्त्व नव्हते हे लक्षात घेऊनही, इतर नेतृत्व असे बाजूला सारले जाणे जाणीवपूर्वक स्वीकारणे अवघड होते. गांधीजींनाही युद्धोत्तर हालचालींसाठी एक देशव्यापी पक्ष प्रभावशील असणे आवश्यक वाटले असावे; असे वाटणे योग्यही होते.

२) ब्रिटिशांना युद्धप्रयत्नात सहकार्य, निदान अडथळा तरी नाही ही मुळातली भूमिका काँग्रेसचे बळ खच्ची करणारी यापुढे ठरेल, असाही विचार चर्चेत असावा. लीग संपूर्ण सहकार्याच्या भूमिकेवर प्रथमपासूनच होती. हिंदूमहासभा हिरिरीने सैन्यभरतीचा प्रचार करत होती. जून ४१ पासून कम्युनिस्टांना 'लोक-युद्धा'चा साक्षात्कार झाला होता. या सर्व गदारोळात काँग्रेसने सहकार्य, निदान विरोध नाही, अशी भूमिका सुरू ठेवली असती तर जनता हिंदूमहासभा, कम्युनिस्ट यांच्याकडे झुकण्याचा धोका काही प्रमाणात होता. एकतर्फी युद्ध लादले म्हणून प्रांतातल्या मंत्रिमंडळांचे राजीनामे, अमेरिका-चीनच्या दडपणाने ब्रिटनने काही दिखाऊ कृती केली त्यातला पोकळपणा दाखवत त्या योजनांना नकार या मालिकेत स्वस्थ बसून राहाणे यावर पक्ष जनतेच्या नजरेतून उतरला असता. त्यातच पक्षातल्या डाव्यांनी नेतृत्वाला डावलून उडी घेतली असती तर वाट आणखी बिकट झाली असती. युद्धानंतर वसाहत स्तरापर्यंतच्या, कदाचित संपूर्ण स्वातंत्र्याच्या वाटाघाटी होणार हे उघड होते. त्यावेळी पक्ष पुरेशा जनादेशासह भारतव्यापी असणे आवश्यक वाटणे स्वाभाविक आहे.

३) १९२०-२२ या लढ्याला पहिल्या महायुद्धाची पार्श्वभूमी आहे. युद्धात जादा भरती केलेले सैन्य कमी करणे (डिमोबिलायझेशन), नागरी नोकऱ्यांमध्ये युद्धकाळात फुगवटा झालेला असतो तो कमी करणे अशा कारणांनी बेरोजगारीचे प्रमाण वाढले होते. त्याचा असंतोष होता. १९२९ च्या वॉल स्ट्रीट कोसळण्याच्या प्रकारातून जागतिक मंदीची लाट आली. त्याचे काही परिणाम भारतावरही झाले. जी काय थोडीबहुत कारखानदारी होती त्यातून बरखास्ती तर जागतिक मंदीमुळे

व्यापारात शिथिलता यामुळे असंतोष होता. साहजिक १९२० व १९३० वगैरे लढ्यांमध्ये या असंतोषाची भर पडून लढे जास्त तीव्र होऊ शकले. दुसऱ्या महायुद्धाचा अंदाज १९३७ लाच आला व मंदी हटत १९३८ पासून कारखाने भरभराटीस येऊ लागले. १९३९ पासून सैन्यभरतीलाही जोम आला. यामुळे १९२०, ३० वगैरे काळातला बेरोजगारीतून उद्‌भवलेला असंतोष १९४२ साली नव्हता. उलट नोकऱ्या, त्यातून येणारा पैसा, युद्धकालीन कंत्राटकामे यामुळे तुलनेने भरभराट होती. या वातावरणात लढ्याला फार जोर येणार नाही, सबब टाळलेला बरा असाही एक धागा १९३९ ते जून ४२ पर्यंत विचारात असावा.

जागतिक महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर खंडप्राय भूभागाचे भविष्य ठरवण्यातल्या घटनांमधली महत्त्वाची घटना म्हणून ४२ चा लढा हा अनेकपदरी विषय आहे. या चर्चेनिमित्त विचाराला चालना देता आली. माझ्यातर्फे हा विषय इथेच थांबवत आहे.

*विश्वास दांडेकर*

**प्रतिसाद**

सत्याचा शोध हा अंशतः घटिते, तथ्ये यांच्या आधारे घेतला जातो. पण पाहणाऱ्याची, समजून घेणाऱ्याची दृष्टी व आलोक यांचाही काही भाग सत्य काय हे समजून घेण्यात असतो. जॉन बर्गर नावाच्या लेखकाच्या एका पुस्तकाचे शीर्षक *Ways of Seeing* असे आहे आणि ते मोठे अर्थपूर्ण आहे. श्री. दांडेकर आणि मी, आमच्या पाहण्याचा 'दृष्टी'त अंतर आहे. हे जे अंतर आहे त्याला अनेक पैलू आहेत, आणि ही गोष्टही स्वाभाविक आहे. म्हणून, त्यांचे मुद्दे खोडून काढण्याचा प्रयत्न न करता प्रतिसाद देत आहे.

१९३९ ते १९४२ या काळात, इंग्लंड मोठ्या अडचणीत आले असताना, 'शेवटचा धक्का' देणारा मोठा लढा उभारण्या-साठी दबाव येत असतानाही गांधींनी सतत नकार दिला. हा नकार देत असताना, काही विशिष्ट बाबींवरून निषेधही नोंदविला. 'वैयक्तिक सत्याग्रहा'चा लढाही दिला. जर्मनी, इटली-जपान ('ॲक्सिस पॉवर्स') यांच्या विरोधात त्यांची सहानुभूती इंग्लंड-चीन आणि हिटलरच्या टाचेखाली आलेली युरोपीय राष्ट्रे यांच्या बाजूने होती; ते तटस्थ, उदासीन नव्हते. या पार्श्वभूमीवर, १९४२ च्या मध्यावर परिस्थितीत – म्हणजेच परिस्थितीच्या गांधींच्या वाचनात – असा कोणता फरक पडला ज्यामुळे गांधींनी त्यांची भूमिका बदलली? या प्रश्नाचे उत्तर मी शोधत होतो.

युद्धातला त्यांचा पक्ष तरीही बदलला नाही. हे लक्षात घेतले तर, लढ्याचा निर्णय का घेतला, हा प्रश्न अधिकच टोकदार बनतो. दग्धभू धोरण राबवीत ब्रिटिश भारताची भूमी सोडून जाणार तेव्हा त्यांना हुसकण्याचे लक्ष्य ठेवून लढा उभारण्याचे कारण उरत नाही; लोकांची उभारी टिकविणे व हिंमत वाढविणे, जपानी सैन्य भारताला स्वतंत्र व मुक्त करण्यासाठी येत आहे या भ्रमात राहून लोकांनी त्याचे स्वागत करण्याची घातकी भूमिका घेऊ नये, आत्मनिर्भर व्हावे यासाठीच हा लढा असू शकत होता. ही गोष्ट मला स्पष्ट दिसते, या माझ्या उत्तराला गांधींच्या लेखनात पुरेसा आधार मिळतो.

युद्धाचे पारडे फिरण्याचा काळ जून ४२च्या आसपासचाच असल्याचे दांडेकरांच्या विवेचनावरून मला दिसते. माझा तर्क असा की, गांधींच्या मनाचा निर्णय ज्या महिन्यांमध्ये झाला त्या महिन्यांमध्ये (मार्च-मे १९४२) परिस्थिती दोलायमानच होती. लढ्याचा निर्णय वर्किंग कमिटीमध्ये होऊन (जून ४२) प्रत्यक्ष-लढ्याच्या सुरुवातीपर्यंत (ऑगस्ट ४२) पारडे फिरले होते. याची कल्पना काही प्रमाणात वरिष्ठतम सेनाधिकाऱ्यांना जून-ऑगस्ट ४२ या काळात आली असेल, पण गांधींपर्यंत याची कल्पना येणे शक्य कोटीतली गोष्ट नव्हती. शिवाय, तोवर बाण सुटलेला होता, असेही म्हणता येईल.

हा लढा कोणत्या उद्देशाने व्हावयाचा आहे याविषयी गांधींचे लेखन पुरेसे स्पष्ट होते. त्याच वेळी, लढा उभारण्याची भूमिका गांधींनी घेतल्याचे जाहीर झाल्या क्षणापासून तोवर थोपवून धरलेल्या ब्रिटिश-विरोधी भावनांना उधाण आले, आणि बहुतेकांचे 'कान बंद' झाले. 'करेंगे या मरेंगे' या निर्वाणीच्या भापेमुळे हिंसा-अहिंसाविवेक उरला नाही. कॉंग्रेसवाले उतावीळही झाले. मागे वळून पाहता, ४२चा लढा हा असा लढा दिसतो ज्याची सूत्रे गांधींच्या हाती राहिली नाहीत. ते तुरुंगाबाहेर राहिले असते तरी फार काही वेगळे घडले नसतेः सूत्रे निसटलेलीच राहिली असती. किंबहुना, १९४० सालानंतर कॉंग्रेसच्या प्रस्थापित नेतृत्वाची भूमिका व गांधींची भूमिका यातले अंतर वाढतच गेले, ही वस्तुस्थिती प्रा. निर्मलकुमार

बोस यांनी निदर्शनास आणलेली आहे. बंडखोर, जहाल नव्या पिढीच्या तरुण नेत्यांच्या भूमिका तर वेगळ्या झाल्या होत्याच.

व्हाइसरॉय लिनलिथगो त्यांच्या बाजूने, मुत्सद्दीपणाचा भाग म्हणून, 'सामंजस्य व परस्परविश्वास' वरकरणी दाखवीत होते का? वरिष्ठ व वरिष्ठतम ब्रिटिश राजकारणी नेत्यांबरोबर गांधींचे दक्षिण आफ्रिकेतील त्यांच्या कार्यकालापासून संबंध आले होते. गव्हर्नर-जनरल, व्हाइसरॉय, गव्हर्नर या पदांवरील व्यक्ती अखेरीस एका उच्चतर नेतृत्वाच्या धोरणांनुसार निर्णय घेणार, वागणार याचे भान गांधींना होतेच. तरीही, यांपैकी काहींच्या बरोबर त्यांचे संबंध अधिक जवळिकीचे प्रस्थापित झाल्याचेही दिसते. लिनलिथगो यांच्या बाजूने आत्मीय संबंध होते की नाही, खात्रीपूर्वक सांगणे शक्य नाही. पण 'सामंजस्य व विश्वास' दिसतो. महायुद्धात दोस्त राष्ट्रांचा पक्ष गांधींनी घेतला आहे ही गोष्ट याला कारणीभूत होती, असे मला दिसते. गांधी केवळ धोरणीपणाने पत्रात काही लिहीत होते असे मला वाटत नाही.

लढ्याची हाक आपण कोणत्या उद्देशाने देत आहोत हे आपले सहकारी, अनुयायी व सर्वसाधारण लोक यांच्यापर्यंत पोचविण्यात गांधी अपयशी ठरले ही गोष्ट मी म्हटली आहेच. त्यांच्या भाषावापरात व संवादकौशल्यात ते कमी पडले असे नसून, इतरांच्या त्यावेळच्या मानसिकतेमध्ये व एकंदर वातावरणात या अपयशाचे कारण होते.

गांधींचा उद्देश काय होता, लढ्याने त्यांना अभिप्रेत काय होते याविषयी तर्क लढवावा लागत आहे, 'अर्थ बसवावा लागत' आहे हे मला पटत नाही. गांधींच्या लेखनामधून या गोष्टी स्पष्ट समोर येतात.

इंग्लंडमधील व भारतातील ब्रिटिश प्रशासनाची प्रतिक्रिया समजू शकते, पण म्हणून ती योग्य होती असे ठरत नाही. १९१७ सालच्या चंपारण्यामधील लढ्यापासून सातत्याने अनुभव असा राहिला की लोकक्षोभामधून होणाऱ्या हिंसेच्या उद्रेकाचे नियमन करण्याची, प्रसंगी लढाही मागे घेण्याची भूमिका गांधींनी पार पाडली. या मागे भूमिका हीच असे की, ब्रिटिश हे शत्रू नव्हेत; स्वातंत्र्य संपादित करावयाचे आहे तेही ब्रिटिशांच्या सहकार्याने व दोस्तीने. काँग्रेसच्या नेत्यांपैकी सर्वांची भूमिका ही नव्हती (उदा. सुभाषबाबू). एका अर्थी, गांधी हे ब्रिटिशांचे सच्चे मित्र म्हणता येतात. ४२ चा लढा कमीतकमी हिंसक व विध्वंसक व्हायचा तर त्यासाठी सर्वात जास्त मदत गांधींचीच होणार होती. लढा देण्याची गांधींची पद्धती व तंत्र यांचे वेगळेपण जवळपास पन्नास वर्षांच्या काळात ठसले होते. प्रतिपक्षीयाला आपल्या प्रत्येक चालीची, त्यामागील उद्दिष्टांची, तिच्या मर्यादेची स्पष्ट कल्पना देण्याविषयी गांधींचा आग्रह हा याचा एक भाग होता. "उच्च नैतिक पातळीवरून अत्यंत सर्जनशील विधायक राजकारण" म्हणत असताना हे सर्व माझ्या मनात आहे. तीव्रतम लढाही माणुसकी व बंधुभाव न सांडता, एक संवादाचाच प्रकार म्हणून चालवायचा, आणि त्यासाठी अहिंसेचे पथ्य सांभाळावयाचे, या भूमिकेचे हे वर्णन आहे. हे काहीही लक्षात न घेता, आपल्या ८ ऑगस्टच्या भाषणात, कोणती कृती करावयाची हे स्पष्ट केले जाईपर्यंत लोकांनी थांबायचे आहे, आंतरिक तयारी करावयाची आहे हे गांधींनी स्पष्ट केले असतानाही, सरकारने निर्घृणपणे दडपशाहीचा वरवंटा फिरविण्यास सुरुवात केली. सरकारचे वर्तन समजू शकते, पण अयोग्यच होते. गांधींची तीव्र प्रतिक्रिया स्वाभाविक होती. असो.

हा विषय माझ्याही बाजूने मी थांबवीत आहे.

*वसंत पळशीकर*



# अक्षरवेध

**निवडक सानेगुरुजी** – संपादक रा.ग. जाधव, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे १९९९, किं. २५०/-.

गुरुजींच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांच्या आत्मकथन, कथा, कादंबरी, चरित्र, पत्रे, कविता, स्त्री-गीते, स्वतंत्र तशीच अनुवादिक विचारपरंपरा इत्यादीतील निवडक वेच्यांचे संकलन केले आहे.

याशिवाय गुरुजींची १७ छायाचित्रे आहेत. १४ पृष्ठांत त्यांचा संक्षिप्त जीवनपट आहे. त्यांच्या समग्र साहित्याची संक्षिप्त वर्णनपर सूची आहे. तीत गुरुजींची मनोगते, प्रस्तावना, समीक्षकांची मते यातला संबंधित भाग आहे. साहित्याला लेखनकाल, लेखनेतिहास आहे. अप्रकाशित साहित्यांचाही निर्देश आहे. ग्रंथ साधनग्रंथ म्हणून मोलाचा आहे. परिशिष्टात हरिजनांच्या मंदिर प्रवेशासाठी केलेल्या उपोषणप्रसंगी गांधींना दिलेले उत्तर आहे, तसेच त्यांची अखेरची पत्रे आहेत.

सुमारे पाचशे पृष्ठांत गुरुजींचे विविध साहित्य आहे. कादंबऱ्यांच्या उताऱ्यांच्या आधी थोडी पार्श्वभूमी दिली असती तर बरे झाले असते. निवडीबाबत नेहमीच मतभिन्नता असू शकते. *मानवजातीची कथा* या दुर्मिळ ग्रंथातला एखादा उतारा हवा होता. काही अप्रकाशित साहित्यही देता आले असते तर बरे झाले असते.

या भागानंतर महत्त्वाचा भाग म्हणजे श्री. रा.ग. जाधव यांनी लिहिलेला 'जीवन आणि वाङ्मय : काही नोंदी, काही निरीक्षणे' हा २४ पृष्ठांचा भाग. हा लेख चिकित्सापूर्वक तसाच भक्तिभावानेही लिहिलेला आहे. गुरुजींच्या वाङ्मयाबद्दल निव्वळ भक्ति बाळगणाऱ्यांना तसेच पूर्वसूरींच्या आक्षेपांमुळे गोंधळलेल्यांना हा भाग उद्बोधक वाटेल. मात्र सर्वच मते पटतील अशी नाहीत. काही मते जादा भलावण करणारी वाटतील.

'श्याम, साने गुरुजी आणि अण्णा या नामांचा गर्भितार्थ कुणी उलगडायला हवा' असे जाधव म्हणतात. त्यातून काय साधणार आहे ते त्यांनी सांगायला हवे होते. 'पत्रकारिता त्यांच्या जीवनाची अटळ गरज होती हे' जाधव सप्रमाण दाखवतात. त्यांची चार ठळक कृतिपर्वे दाखवतात. 'त्यांच्या त्यागाच्या भात्यातील अखेरचा बाण प्राणत्यागाचा होता. तो कोणत्या मूल्यासाठी वापरला त्याचा नेमका अर्थ मराठी समाजाने लावायला हवा' असे श्री. जाधवांचे म्हणणे. या संदर्भात त्यांनी ना.ग. गोरे यांच्या 'स्वप्नभाषण' (येशूचा वधस्तंभ) या लेखाकडे वळायला हवे होते. गुरुजींचे वाङ्मय हे ऐकण्यासाठी आहे हे त्यांचे निरीक्षण, तसेच बालसुलभ निष्पाप प्रमादांची उपपत्ती पटण्यासारखी आहे. आंतरभारतीची संकल्पना देशीवादाचे या देशातील पहिले पाऊल आहे असे जाधवांना वाटते. मात्र डांटे आणि टागोर यांचे ऋण ते मानायला विसरत नाहीत. श्री. जाधव 'अतिआत्मपरता सर्वात्मपरतेत परिणत होते का? अतिदाट आत्मपरता आत्मविलोपन घडवून आणते काय?' अशा प्रश्नांची उत्तरे वाचकावर सोपवतात. त्यांना गुरुजींचा आस्तिकवाद गतिमान, विकसनशील वाटतो. जाताजाता श्री. जाधव अस्तित्ववाद्यांना कोपरखळी मारतात "अस्तित्ववादापेक्षा आस्तिकवाद हाच आपला खराखुरा सांस्कृतिक वारसा आहे, हे आपणास केव्हा पटणार?" अस्तित्ववाद्यांत सांस्कृतिक संवेदनशीलता दुर्मिळ आहे असे ते गृहीत धरतात की काय नकळे. साठोत्तरी कालखंडात दलित-ग्रामीण-बहुजनवादी सर्जनशील भान आले त्याची आद्य प्रस्फुरणे गुरुजींच्या साहित्यात उमटली हा जाधवांचा दावा आहे. गुरुजींनी देशी निम्नस्तरीय सांस्कृतिक घटकांकडे आपले सर्वांचे लक्ष प्रभावीपणे वळवले. गुरुजी सोसण्या-लिहिण्याच्या टप्प्यावर होते. (हे सांगून महान लेखकाएवढे ते उंच नव्हते हेही श्री. जाधव मान्य करतात). 'करी मनोरंजन जो मुलांचे! जडेल नाते प्रभूशी तयाचे' हे त्यांच्या साहित्याचे ब्रीदवाक्य होते. सर्व वाङ्मयप्रकाराचे त्यांनी अनुवाद केले. "अनुवाद म्हणजे रूपांतरे" अशी पुस्ती जोडतात! "गुरुजींच्या निष्ठेने,






मातृभाषेच्या प्रेमाने इंग्रजी इ. भाषेतील वाङ्मय येत राहिले असते तर इंग्रजीचे समाजमनावरील वर्चस्व रोखता आले असते" असे श्री. जाधवांना वाटते. (मग समाजमन मूळ इंग्रजी वाङ्मयाकडे वळले नसते. हा फायदा झाला असता?) ह्या रूपांतरात श्री. जाधव यांना देशीवादी भूमिकेचा प्रेरक आविष्कार दिसतो. आपल्या मीपणाचा पुरस्कार त्यांनी फक्त काव्यात केला. त्यांचे साहित्य छात्रवुद्धीने वाचायचे साहित्य होते. हे मत स्वीकारता येईल असे वाटत नाही. गांधीपर्व उत्साहपर्व होते याची प्रचिती गुरुजीसारख्यांनी दिली. त्यांच्या आत्मार्पणातही उच्चार-विचार-आचारातील सुसंगती होती असे श्री. जाधव मानतात. साने गुरुजींना ते विसाव्या शतकाच्या पूर्वार्धाचा सांस्कृतिक मराठी प्रतिनिधी म्हणून गौरवतात. ते योग्यच आहे.

हा एवढा ग्रंथ किती व्यक्ती घेऊ शकतील? शाळेत असला तर किती जणांच्या वाट्याला वर्षभरात येईल?

साने गुरुजींचा सामान्य, गरीब वाचकवर्ग लक्षात घेता त्यांच्या निवडक साहित्याच्या छोट्या छोट्या पुस्तिकाच निघायला हव्या. श्री. रा.ग. जाधवांचा लेख स्वतंत्र पुस्तिकेच्या रूपाने सर्वत्र पोचायला हवा. मघाशी उल्लेखिलेला ना.ग. गोरेंचा लेख 'स्वप्नभाषण' तसेच शांता गोखले यांचा 'स्त्रीवादी दृष्टिकोनातून 'श्यामच्या आई'चे परीक्षण" हा लेख, यांचे उल्लेख व त्यांवरील मते राहून गेली असावीत.

*आ.ना. पेडणेकर*

---

**आचार्य जावडेकर - पत्रे आणि संस्मरणे** – संपादक : तारा भवाळकर, लोकवाङ्मय गृह, मुंबई , १९९६, रु. ५०.००.

---

स्वातंत्र्य चळवळीतील सहभागामुळे तुरुंगवासाची शिक्षा आचार्य शं.द. जावडेकर यांना होत असे. त्या काळात जी व्यक्तिगत पत्रे आचार्यांनी आपल्या कुटुंबियांना लिहिली त्यांतील निवडक पत्रांचे संकलन श्रीमती तारा भवाळकर यांनी या पुस्तकात प्रसिद्ध केले आहे.

आचार्य जावडेकर यांनी ही पत्रे १९३२-३३ साली नाशिकच्या सेंट्रल जेलमधून लिहिलेली पत्रे आहेत. यांतील एकवीस पत्रे सुशिलाबाईंना (पत्नी) लिहिलेली आहेत. एक पत्र मुलांना उद्देशून लिहिले आहे.

आचार्यांनी दीड डझनाहून अधिक पुस्तके लिहिली आहेत. *राजनीतीशास्त्रपरिचय, राज्यशास्त्रमीमांसा समाजवाद आणि गांधीवाद, आधुनिक भारत इत्यादि* नावांवरूनच आचार्यांची विद्वत्ता, व्यासंगी अभ्यासू वृत्ती, बुद्धिमत्ता, विवेचक दृष्टी इत्यादी गुणविशेषांचा अंदाज येऊ शकेल. पण त्यांनी लिहिलेल्या व्यक्तिगत पत्रांतून मात्र त्यांचे हळुवार संवेदनाक्षम मन डोकावते.

या संग्रहातील सर्व पत्रांना सुशिलाबाईंनी उत्तरे दिली आहेत. त्यांत त्यांनी स्वतःचे विचार, मनात आलेल्या शंका, स्वतःची मतं उपस्थित केली असावीत. पण ती पत्रे या संग्रहात नाहीत. परंतु त्यांनी स्वतःच्या जडणघडणीविषयी, आचार्यांविषयी किंवा इतरही काही व्यक्तींविषयी लिहिलेली संस्मरणे पुस्तकात समाविष्ट केली आहेत.

या संस्मरणांत सुशिलाबाईंनी त्यांच्या आईचे रेखाटलेले व्यक्तिमत्त्व आहे, त्यांच्या माहेरचे देव घराणे आणि सासरचे जावडेकर घराणे यांतील भिन्न वैशिष्ट्ये त्यांनी नमूद केली आहेत. आचार्यांची वृत्तिविशेषताही त्यांनी नेमकेपणाने टिपली आहे. 'स्थितप्रज्ञ' या संस्मरणात त्या लिहितात, "भगवद्‌गीतेत स्थितप्रज्ञाची जी लक्षणे सांगितली आहेत ती लक्षणे त्यांच्यात होती. कोणतेही विकार नाहीत, कसलीही अभिलाषा नाही, महत्त्वाकांक्षा नाही; आहे त्यात संतोष मानायची वृत्ती. यामुळे त्यांच्या मनाची शांती कधी कमी झाली नाही." 'आचार्यांच्या सहवासात' या संस्मरणात त्या लिहितात, "दरवर्षी गणपती-उत्सवात व्याख्यानांसाठी बाहेरगावची बोलावणी यायची, व तेथे जाऊन आल्यावर ते खोकल्याने आजारी पडावयाचेच. त्यांनी बाहेरगावी जाऊ नये असे माझे म्हणणे असे तर 'लोकजागृती करण्याचे माझे ध्येय आहे व ते कोठल्याही परिस्थितीत मला केलेच पाहिजे' असे त्यांचे आग्रहाचे सांगणे असे. कोणत्याही गोष्टीचा निर्णय पूर्ण विचार करूनच ते घेत असत व एकदा निर्णय झाल्यावर त्याप्रमाणे तंतोतंत वागत असत."

या संस्मरणांतून सुशिलाबाई जावडेकर यांची अवलोकन-शक्ती व बुद्धी दिसून येते. तसेच आपल्या बुद्धीला त्यांनी कुंपणे घातली नाहीत हेही लक्षात येते. त्यांनी लिहिले आहे,






अनुक्रमणिका

"एकदा गणपतीपुढे आचार्य भागवतांचे भाषण होते. विषय होता - 'धर्म ही अफूची गोळी आहे'; मला हा विषय काहीसा वेगळाच वाटला. धर्म ही केवढी पवित्र गोष्ट; तिची तुलना अफूच्या गोळीशी कशी होते, हे समजले नाही म्हणून मुद्दाम भाषणाला गेले. आचार्यांनी (भागवत) व्याख्यानात इतके सुंदर विवेचन केले की मला ते मनोमन पटले."

आचार्यांच्या पत्नी सुशिलाबाई यांच्या सुजाण व्यक्तिमत्त्वाचा परिचय त्यांच्या संस्मरणांतून होतो. आचार्य जावडेकर यांनी त्यांना लिहिलेली पत्रे व्यक्तिगत स्वरूपाची असली तरी संग्राह्य होतात. आचार्यांचे विचारधन त्यातून प्रगट होते. मुलांच्या शिक्षणाविषयी कशी काळजी घ्यावी हे पत्नीला लिहिताना एकूण शिक्षणपद्धतीविषयीच विचार मांडले जातात. जसे "शाळेतील स्पर्धेमुळे मुले थोडा अधिक उद्योग करीत असली तरी नैतिकदृष्ट्या स्पर्धेचे परिणाम वाईट होतात." त्यापुढे ते लिहितात, "स्मरणशक्ती, ग्रहणशक्ती, कल्पकता वगैरे बुद्धीचे निरनिराळे गुण असतात. ते निरनिराळ्या प्रमाणात निरनिराळ्या व्यक्तींमध्ये असतात हे लक्षात घेऊन त्यांचे शिक्षण आखले पाहिजे." (पान ३४)

आचार्य जावडेकर यांचे जीवन ध्येयनिष्ठ होते. ब्रिटिशांविरुद्धच्या असहकारितेच्या चळवळीत शाळाकॉलेजांवर बहिष्कार टाकल्यामुळे, एम.ए. चा अभ्यास झाला असूनही आचार्यांनी परीक्षा दिली नाही. पदव्युत्तर शिक्षणाचे सर्टिफिकेट नसल्याने त्यांच्या विद्वत्तेची, ज्ञान-तपश्चर्येची जगाला ओळख होण्यास काही काळ जावा लागला. त्या काळाबद्दल सुशिलाबाईंनी लिहिले आहे, "आमच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना आमचे घर आळशी आणि ऐतखाऊ लोकांचे वाटत होते, माझ्या मनावर त्याचा फार परिणाम त्यावेळी झाला." (पान ५३) आचार्य जावडेकरांच्या वडिलांना, आपला मुलगा एवढा व्यासंगी, बुद्धिमान असूनही त्याला साजेसे अर्थार्जनाचे साधन अथवा अधिकाराची जागा त्याच्या असंग्रही वृत्तीमुळे मिळत नाही याचा खेद वाटत असे (पान ५३), असे सुशिलाबाईंनी नमूद केले आहे.

स्वतः सुशिलाबाईंना आपल्या पतीच्या, 'की घेतले न व्रत हे आम्ही अंधतेने' या दृढनिश्चयाची लग्नाआधी अथवा लग्नानंतरच्या सुरुवातीच्या काळामध्ये जाणीव होती का? त्यांच्याशी त्या दृष्टीने मोकळेपणाने चर्चा आचार्यांनी केली होती का, यासंबंधी या पुस्तकात माहिती मिळत नाही.

येथे एक प्रसंग मला आठवतो. १९८० च्या सुमारास पिंपरी येथील रयत शिक्षण संस्थेच्या शाळेत राष्ट्रसेवादलाचे कुमार शिबिर भरले होते. आदरणीय एस.एम. जोशी कार्यकर्त्यांशी अनौपचारिक गप्पा मारायला आले होते. तेव्हा त्यांनी सांगितले की, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बऱ्याच वर्षांनी एका गृहस्थांनी त्यांना विचारले, "काय हो, स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतला तेव्हा एकेकावेळी दोन दोन वर्षांहूनसुद्धा अधिक काळ तुम्ही तुरुंगवास भोगलात, पण त्यासाठी तुम्ही तुमच्या पत्नीची मान्यता घेतली होतीत का?" एस.एम. म्हणाले की, त्यावेळी त्या गृहस्थांना त्यांनी उत्तर दिले की, ताराबाईंनी (एस.एम. च्या पत्नी) त्यांच्याशी विवाह केला तोच मुळी त्यांच्या कार्याची माहिती जाणून घेतल्यावर, आणि स्वतः नोकरी करून संसार करण्याच्या तयारीनेच. एसेम. पुढे म्हणाले, "परंतु, तुरुंगवासात मी असताना, एकटीने तिने दिवस कसे काढले असावेत, याविषयी मात्र फारसा विचार केलेला मला आठवत नाही. पण माझ्या पत्नीलाही त्याबद्दल नाराजी वाटली नसावी; सर्व अडचणींना तोंड देण्याची तिची तयारी होतीच, असेच मला वाटत आले. आता मात्र असे वाटते की, पत्नीला इतके 'गृहीत' धरणे ही काही तितकीशी चांगली गोष्ट झाली नाही." असो.

आचार्य जावडेकरांनी पत्नीशी विचारविनिमय केला असेलही किंवा नसेलही. परंतु सुशिलाबाईंनी निश्चितच आचार्यांच्या व्रतस्थ जीवनाची महती जाणली होती. आचार्यांनाही पत्नीच्या बौद्धिक क्षमतेची जाणीव असावी. पत्नीचे वाचन वाढावे यासाठी त्यांनी विशेष लक्ष घातले. पत्नीचा (त्याकाळी, १९१९-२० च्या सुमारास) मॅट्रिकचा अभ्यास चालू असताना, *रघुवंश*, *मेघदूत*, *गंगालहरी* सारखी काव्ये त्यांनी पत्नीकडून वाचून घेतली. कधी 'मॉडर्न रिव्ह्यू' या प्रख्यात मासिकातील लेख, तर कधी आगरकरांचे लेख आचार्य पत्नीकडून वाचून घेत. त्या काळी आचार्यांचे कुटुंब त्यांच्या बहिणीच्या वाड्यात इस्लामपूर येथे होते. मुले लहान होती. आणि सुशिलाबाईंना नणंदेच्या घरात आपण परतंत्र आहोत असे वाटे. म्हणून सकाळी वाचन करण्यात संकोच वाटे, तर रात्री वाचता वाचता झोप येई. परंतु, ज्या क्षणाला व जेवढे ज्ञान मिळेल तेवढे घ्यावे ही आचार्यांची भावना असल्याने, पत्नी पुरेसे वाचन करू शकत नाही म्हणून कधी निराशही झाले नाहीत अथवा नाराजही झाले नाहीत. (पृष्ठ ५०)

आचार्य जावडेकरांचा कार्यकाल हा, केवळ राजकीयच

अनुक्रमणिका

नव्हे तर, सामाजिक स्थित्यंतराचा काळ होता. त्यासाठी आवश्यक असा भक्कम वैचारिक पाया स्वातंत्र्यचळवळीतील पुरोगामी विचारसरणीच्या धडपडणाऱ्या कार्यकर्त्यांना आचार्यांच्या लिखाणामुळे, ग्रंथसंपदेमुळे मिळाला.

सुशिलाबाईसारख्या सुस्वरूप, सहनशील, समंजस, सुशिक्षित पत्नीची साथ आचार्यांना मिळाली म्हणून त्यांच्या हातून उत्तमोत्तम ग्रंथनिर्मिती झाली असे म्हणता येईल का? तर तसं काही म्हणता येईल असे वाटत नाही. प्रत्येक कर्तृत्ववान पुरुषामागे स्त्री उभी असते असं आपलं म्हणतात. पण झांटिपी-सॉक्रेटिस किंवा जिजाऊ-तुकोबा अशी उदाहरणे पाहिली तर पुरुषांचे कर्तृत्व पत्नीनिरपेक्ष असते असे लक्षात येईल. अर्थात एक गोष्ट विचारात घ्यावी लागेल. ती म्हणजे, जरी काही स्त्रिया या भांडकुदळ, आडमुठ्या असल्या (ज्या प्रमाणे पुरुषही असतात) तरी सर्वसाधारणपणे आपल्या परिवाराचे आणि मुलांचे संगोपन त्या करीत असतात. आडमुठा स्वभाव असला तरी कौटुंबिक जबाबदारी घेणे हे स्त्रिया स्वतःचे कर्तव्य मानतात. समाजाची अपेक्षाही तशी असते. पण पुरुषांचा स्वभाव हा शांत, समंजस, प्रेमळ असला तरी मुलांचे संगोपन करणे आणि कौटुंबिक जबाबदारी घेणे त्यांच्याकडून अपेक्षित नसते. एखाद्या पुरुषात विशेष गुण असतील तर त्या क्षेत्रात पुढे जाण्यासाठी कौटुंबिक जबाबदारी त्याच्या आड येत नाही. स्त्रियांमध्ये विशेष गुण असतील तर संसारात राहून त्या विशेष गुणांना वाव मिळणे सर्वसामान्य परिस्थितीत अवघडच असते. पण जर घराणे सुसंस्कृत, सुशिक्षित, संपन्न आणि सुधारक असेल तर पति-पत्नी आपापल्या क्षेत्रात चमकू शकतात, जसे महान शास्त्रज्ञ विक्रम साराभाई आणि श्रेष्ठ नृत्यांगना मृणालिनी साराभाई.

तर, आचार्य जावडेकरांनी, सुशिलाबाई यांना जी पत्रे लिहिली आहेत त्यावरून आचार्यांच्या मृदु, हळुवार, प्रेमळ स्वभावाचे दर्शन होते. त्यांची विद्वत्ता या सर्व पत्रांमधून डोकावते, परंतु तीही अत्यंत नम्रतेने. उदा. पत्नीने विचारलेल्या देवयान पंथाबद्दल (पान २२) ते लिहितात, "पुस्तक एकंदरीने बरे आहे, परंतु माझे यासंबंधी जे विचार आहेत, त्या दृष्टीने त्याचा विचार होईल असे वाटत नाही. परमात्मा म्हणजे काय व आत्मसाक्षात्कार म्हणजे काय यासंबंधी माझ्या मनात बरेच संशय आहेत." असे म्हणून झाल्यावर आचार्यांनी अत्यंत सोप्या भाषेत, प्रेम व सत्य यांनाच परमेश्वर कसे मानता येईल, तसेच दरिद्रीनारायणाची सेवा करणे व आपला स्वार्थ नाहीसा करणे हा मार्गसुद्धा आत्मसाक्षात्काराचा कसा आहे याचे विवेचन केले आहे. पत्नीने पत्रातून लिहिलेल्या श्रेय व प्रेय यासंबंधीच्या प्रश्नाचे उत्तरही आचार्यांनी असेच सोप्या, सहज, अर्थपूर्ण पद्धतीने लिहिले आहे. आणि हे सर्व लिहिताना पुढे ते म्हणतात, "यामध्ये व्याख्यान देण्याचा कोणताही हेतू नाही. तुम्हांला ती दृष्टी नाही असे माझ्या मनात नाही हे येथे सांगून ठेवतो. सहज सुचलेले विचार तुम्हांस कळविण्याचा हा एक मार्ग आहे. विचारविनिमय हा मुख्य हेतू आहे." एकंदरीने, आचार्यांनी बौद्धिक पातळीवर पत्नीला सहकारी मानलेले दिसते. तुरुंगातून लिहिलेल्या जवळजवळ सर्वच पत्रांमधून पत्र कधी लिहून कधी पोस्टात टाकावे, भेटायची परवानगी असल्यास कोणते नियम पाळावेत इत्यादीसंबंधी विस्तृत सूचना आहेत. तुरुंगातील जाचक नियमांमुळे अनवधानाने पत्नीचे पत्र मिळायचे राहू नये, भेटीची वेळ चुकू नये ही उत्कट इच्छा त्यामागे दिसते. अर्थात त्या काळाप्रमाणे हे सर्व संयमित भाषेत लिहिले आहे. आचार्य कौटुंबिक नातीगोती, मग ती पत्नीच्या माहेरकडची असोत अथवा त्यांच्या पित्याकडची असोत, वा स्नेह्यांसंबंधीची असोत आत्मीयतेने जोपासताना दिसतात. स्वतःच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वापुढे पत्नीचे व्यक्तिमत्त्व ते झांकोळून देत नाहीत. मुलगे आणि मुली यांना वेगळ्या पद्धतीने वागविले जाऊ नये असेही त्यांना विचारपूर्वक वाटते. ते लिहितात, "मुलांच्या शिक्षणाबद्दल आणखी एक मुद्दा माझ्या मनात फार येऊ लागला आहे. तो म्हणजे आपले कपडे धुणे, अंथरुणे घालणे, केर काढणे वगैरे शरीरकष्टाची कामे ज्यांची त्यांनी करण्याची त्यांना सवय लागण्याइतके त्यांचे वय झाले आहे असे मला वाटते. ही कामे आपल्या घरी नोकरांकडून करून घेण्याची जी चाल आहे ती समर्थनीय नाही.... माझ्या सवयी या बाबतीत मला आता फार जाचक व वाईट व दुर्बलपणाच्या वाटू लागल्या आहेत... आमच्यासारख्यांच्या घरी मुलींना किंवा बायकांना या सवयी लागतच नाहीत कारण त्यांना शरीरकष्टाची पुष्कळ कामे करावीच लागतात... ही कामे पुष्कळ वेळा स्त्रियांवर लादलीही जातात." (पृ. २८)

आचार्यांच्या आधीच्या काळातील लक्ष्मीबाईंची *स्मृतिचित्रे* वाचली तर आचार्यांचे वेगळेपण लक्षात येईल. लक्ष्मीबाईंनी सासूच्या निधनाचा प्रसंग रेखाटला आहे. अत्यवस्थ/आजारी असल्याचे नवऱ्याचे पत्र वाचून त्यांची सासू कल्याणहून

अनुक्रमणिका

मोखाड्याला जाते. सोबत तान्हे मूल आणि त्याहून थोडा मोठा मुलगा (रे.ना.वा. टिळक), आईच्या हातातील ओझे हलके करण्याएवढाच मोठा. संपूर्ण वाट विकट, खडतर, जंगलातून जाणारी, टेकड्यांचा चढ-उतार असलेली. मोखाड्याला आल्यावर पतीला काहीच झाले नाही हे पाहून सासू समाधान पावते. घरातील आवराआवर करून विहिरीवर जाते. अंघोळ करून, धुणे धुऊन, डोक्यावर पाण्याचा हंडा व खांद्यावर धुण्याचे पिळे घेऊन येते. आधीच प्रवासाने व पतीच्या आजारपणाच्या (खोट्या) वातमीमुळे थकलेली, घराशी आल्यावर गप्पा मारीत बसलेल्या नवऱ्याला उद्देशून म्हणते, "एवढा हंडा उतरवून द्यायचा होता." त्यावरोवर, "मी तुमचा चाकर नाही," असे म्हणून संतापलेल्या नवऱ्याने एका हाताने मान धरून पाठीमागून लाथ मारली. ती सहनशील वाई तेथेच कोलमडली आणि आठ दिवस फक्त रामाचे नाव तोंडी घेत मेली. पण आपल्या पत्नीच्या मृत्यूला आपला संतापी स्वभाव कारण झाला याची पुसटशीसुद्धा जाणीव ना लक्ष्मीवाईंच्या सासऱ्याला, ना त्यांच्या कुटुंबियांना. शेजाऱ्यांना तर नक्की काय झाले ते कळलेही नसावे. लक्ष्मीवाईंच्या सासऱ्यांनी जेव्हा वायकोने अडीअडचणीसाठीचे कष्टाने जमविलेले शंभर रुपये वायकोने आणलेल्या गाठोड्यात पाहिले तेव्हा म्हणे ते ओक्साबोक्शी रडले, आणि म्हणाले की, "तिने तिच्या अंतेष्टीसाठीच जणू हे पैसे जमविले होते." कौटुंबिक, धार्मिक, सामाजिक रचनाच अशी की, सहन करणाऱ्याला सहन करणे हा धर्मच वाटावा; आणि, जुलूम करणाऱ्याला इतकी मोकळीक की जुलूम म्हणजे काय हे कळूच नये.... सोप्या भाषेत म्हणायचे झाले तर, पतीचा स्वभाव रागीट असेल तर एखादे वेळी पत्नी अकाली मरू शकते, त्याला काय इलाज? असो.

तर पुरुषप्रधानतेच्या चौकटीवर आधारित चिरेवंदी कुटुंबसंस्था आणि जातिधिष्ठित समाजरचनेला आचार्य जावडेकरांसारख्या वुद्धिमान आणि मृदु व संवेदनशील व्यक्ती, सौम्यपणाने का होईना, विरोध करतात, स्वतःचे वर्तनही स्वतःच्या विचारांना साजेसे ठेवतात तेव्हा घट्ट वसलेले चिरे हलू लागतात व परिसर मोकळा होऊ लागतो. म्हणूनच, *आचार्य जावडेकर – पत्रे आणि संस्मरणे* वाचताना मनाला आल्हाद वाटतो.

***सुलोचना वाणी***

---

**श्री संत चोखामेळा : चरित्र आणि अभंग** – संपादक - स.भा. कदम;
शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, १९९८; रु. १६०.००.

---

मुंवईचे श्री. स.भा. कदम हे एक निष्ठावंत वारकरी. त्यांनी संपादित व प्रकाशित केलेल्या (१९६९) *श्री संत चोखामेळा : चरित्र आणि अभंग* या पुस्तकाची ही दुसरी आवृत्ती. या दुसऱ्या आवृत्तीला सुप्रसिद्ध लेखक व समीक्षक प्रा. भालचंद्र नेमाडे यांची मार्मिक व विचारप्रवर्तक प्रस्तावना जोडलेली आहे. पुस्तकात सांप्रदायिक श्रद्धेचा प्रभाव, तर प्रस्तावनेत आधुनिक चिकित्सेची प्रभा असा योग इथे जमून आलेला आहे.

संत चोखामेळा यांचे चरित्र व अभंग यांवावतीत पुरेसे आस्थेवाईक संशोधन झालेले नव्हते. श्री. कदम यांचे या वावीकडे लक्ष वेधण्याचे काम आळंदीचे ह.भ.प. श्रावणवोवा गंगाधर कांवळे या महार समाजातील थोर वारकऱ्यांनी केले. तीन-चार वर्षांच्या धडपडीनंतर व अनेक प्रकारच्या अडचणींना तोंड देऊन श्री. कदम यांनी स्वखर्चाने चोखोवांचे चरित्र व अभंगसाहित्य प्रथम १९६९ साली पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले. श्रीरामपूरच्या शब्दालय प्रकाशन-संस्थेने प्रा. भालचंद्र नेमाडे यांच्या सूचनेवरून त्या पुस्तकाची ही दुसरी आवृत्ती प्रकाशित केली आहे.

या पुस्तकाचे तीन विभाग आहेत. पहिल्या विभागात चोखोवांचा जीवनवृत्तान्त, त्यांचे कार्य, त्यांचे अभंगवाङ्मय इत्यादी विषय हाताळलेले असून या विभागाची पृष्ठसंख्या सुमारे नव्वद आहे. दुसरा विभाग चोखोवांच्या अभंगरचनांचा असून विषयवार वर्गीकरण करून हे अभंग दिलेले आहेत. याच विभागात संत नामदेव व संत एकनाथ यांनी केलेली चोखोवांच्या जीवनकार्याची निरूपणेही दिलेली आहेत. तिसऱ्या विभागात सोयरावाई, वंका, कर्ममेळा, निर्मलावाई यांची अभंगरचना समाविष्ट केलेली आहे. पुस्तकाच्या शेवटी पुस्तकात संकलित केलेल्या सर्व अभंगांची वर्णानुक्रमणिका जोडलेली आहे.

पुस्तकाच्या आरंभी पहिल्या आवृत्तीमधील संपादकाचे निवेदन व प्रकाशिकेचे हृद्‌गत दिलेले आहे. या दोन्ही प्रास्ताविकांतून चोखोबांच्या संबंधीची कमालीची सांस्कृतिक उदासीनता अधोरेखित झालेली आहे. त्याचप्रमाणे ऐतिहासिक दृष्टीने अत्यंत पुरोगामी असणाऱ्या वारकरी पंथाचा वारसा आणि आधुनिकता यांचा मेळ घालण्याचा जो पेच आहे त्याचीही कल्पना संपादक-प्रकाशिकांच्या मनोगतावरून येऊ शकते.

श्री. स.भा. कदम हे स्वतःला, या पुस्तकाचे लेखक नव्हे तर संपादक म्हणवून घेतात; तथापि यात त्यांची विनयशीलताच अधिक जाणवते, आणि ती त्यांच्या सांप्रदायिक निष्ठेशी व परंपरेशी सुसंगतच आहे. कदमांनी या पुस्तकातील चोखोबांच्या जीवनकार्याची सुमारे नव्वद पृष्ठांची मांडणी स्वतः केलेली आहे. ही मांडणी म्हणजे केवळ यांत्रिक पद्धतीने केलेले संकलन म्हणता येणार नाही. हे स्वतंत्र असे मीमांसापर लेखनच आहे. चोखोबांसारख्या प्राचीन व विशेषतः दलित संतकवीच्या बाबतीत अस्सल चरित्रसाधने व अस्सल चरित्रलेखन यांची अपेक्षा करणे रास्त असले, तरी एका परीने आपल्या समाजात अशी अपेक्षा करणे हे अवास्तव ठरणारेच आहे. त्यामुळेच दंतकथा, उत्तरकालीन चरित्रकथा व अभंगवाणी यांच्या आधारेच चोखोबांचे चरित्र जुळवावे लागते. ही साधने पूर्णपणे सांप्रदायिक पठडीतील असल्याने निष्पन्न होणारे चरित्र हे प्राधान्याने सांप्रदायिक चौकटीतलेच ठरते. म्हणजे एका परीने संत नामदेव, संत एकनाथ, महिपती इत्यादी पूर्वकालीन चरित्रकथनकार ज्या रीतीने चोखोबांना उभे करतात तशाच रीतीने श्री. कदम हेही चोखोबांना उभे करतात. म्हणून कदमांचे हे चोखोबा-चरित्र सांप्रदायिक चौकटीतलेच ठरते व ते बहुधा तसेच ठरावे असे कदमांनाही अभिप्रेत आहे. संप्रदायाबाहेरचा एखादा आधुनिक अभ्यासक ज्या पद्धतीने चोखोबांच्या जीवनकार्याचा मागोवा घेऊ पाहील, तसा मागोवा प्रस्तुत पुस्तकात नाही.

श्री. कदम यांच्या लेखनात अनेक प्राचीन-अर्वाचीन अभ्यासक-लेखकांचे, सांप्रदायिक थोरामोठ्यांचे विचार व अभिप्राय सर्वत्र विखुरलेले आहेत. त्याचप्रमाणे चोखोबांच्या अभंगांतील व अभंगांची तसेच इतरही संतांच्या अभंगांची अवतरणे दिलेली आहेत. या उद्धरणप्रवण लेखनप्रवृत्तीमागे एक प्रकारची सात्त्विक चिंताकुलताही – (anxiety -) आहे. ही चिंता चोखोबांना हरतऱ्हेने व अधिकाधिक बाजूंनी समजावून देण्याची आहे. चोखोबांसंबंधी व त्यांच्या संदर्भात उद्‌बोधक ठरणारी जास्तीत जास्त माहिती साठवून ठेवण्याची ही असोशी आहे. तथापि या सर्वसंकलक दृष्टीमध्ये एक प्रकारचा भाबडेपणाही आहे, चिकित्सकता कमी आहे. अर्थात लेखकाच्या सांप्रदायिक भाविक व्यक्तिमत्त्वाशी ही गोष्ट सुसंगतच आहे, यात शंका नाही. मात्र परिणामतः चोखोबांच्या चरित्रचित्रणातील रेखीवता कमीही झालेली आहे.

कदमांच्या या चोखोबा-चरित्रामागे पारंपरिक सांप्रदायिक मूल्यचौकट उभी असल्याने या चरित्रलेखनाला आधुनिक मूल्यभान प्राप्त झालेले नाही; म्हणजे चोखोबांच्या चरित्रातून जे अनेकविध प्रश्न आधुनिक वाचकाला वा जिज्ञासूला जाणवतील, त्यांची परिस्फुटता सांप्रदायिक श्रद्धाव्यूहामुळे होऊ शकत नाही. या उणिवेचे काहीसे निराकरण होण्याच्या दृष्टीने पुस्तकाला जोडलेल्या भालचंद्र नेमाडे यांच्या प्रस्तावनेचा मोठाच उपयोग आहे.

प्रस्तुत पुस्तकातील सर्वांत महत्त्वाचा विभाग चोखोबा व त्यांचे कुटुंबीय यांच्या अभंगरचनेच्या संहितेचा आहे. चोखोबा, त्यांची पत्नी सोयराबाई, पुत्र कर्ममेळा, बहीण निर्मळा आणि निर्मळेचा पती संत बंका या सर्वांचे उपलब्ध अभंग प्रथमच एकत्रित स्वरूपात जिज्ञासूंना या पुस्तकातून वाचावयास मिळतील. या संदर्भात अधिकृत पाठांची समस्या आहेच. संत नामदेव व त्यांचे चोखोबांसारखे अन्य समकालीन संतकवी यांच्या बाबतीत ही समस्या अजूनही कायमच आहे. आणि या समस्येसंबंधी काहीएक निराकरण श्री. कदम यांच्याकडून अपेक्षित करणे न्याय्यही ठरणार नाही. मात्र पाठचिकित्साशास्त्राच्या तज्ज्ञांनी चोखोबासारख्या श्रेष्ठ संतकवीच्या अभंगवाणीचा अधिकृत पाठ तयार करण्याकडे वळले पाहिजे. प्रक्षिप्त संहिता, पर्यायी पाठ, संस्करणे व आधुनिकीकरण यांचा मागोवा घेऊन चोखोबांची एक अधिकृत अभंगगाथा तयार होणे अत्यावश्यक आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे चोखोबा-गाथेची सर्वांगीण समीक्षाही करणे अत्यावश्यक आहे. चोखोबा-गाथा याचा अर्थ चोखोबांच्या पाच कुटुंबीयांची गाथा. ही पंच-कुटुंबीय-गाथा हा केवळ वैशिष्ट्यपूर्ण असा काव्यनिर्मितीचा व्यूह नाही, तर तो वैशिष्ट्यपूर्ण असा सांस्कृतिक जाणिवांचाही एक व्यूह आहे. स्त्री आणि पुरुष या दोहोंच्या मानसिकतेचे पदरही त्यात गुंतलेले आहेत. सारख्याच उत्कट जाणिवा लिंगभेदाने अभिव्यक्तीची भिन्नाभिन्न रूपे कशी धारण करू शकतात, तेही

या रचनाव्यूहातून लक्षात येईल. त्याचप्रमाणे दोन पिढ्यांच्या जाणिवांतील भेदाभेदही त्या व्यूहातून जाणता येतील. संतत्व व कवित्व यांच्या खास मराठी सांस्कृतिक परंपरेत चोखोबा-कर्ममेळा ही रेषा आणि सोयराबाई-निर्मळा ही रेषा उत्तरोत्तर वाढत जाणे फार फार आवश्यक होते. ही वाढ का व कशी खुंटली हाही एक महत्त्वाच्या निम्नलक्ष्यी (Subaltern) साहित्याभ्यासाचा विषय ठरतो.

चोखोबा-गाथेचा वरील अंगांनी अभ्यास करणे हे आपले सांस्कृतिक उत्तरदायित्व आहे. ते पार पाडले तर वारकरी संप्रदाय आणि आधुनिक दलित चळवळ या दोहोंकडून उपेक्षित राहिलेल्या महामनांची खरी थोरवी व खरे योगदान आपणांस कळू शकेल. कारण या महामनांचे आविष्कार मूलतः मानव्याच्या सोसण्याशी - suffering - निगडित आहेत आणि त्यांची पोच संप्रदाय व विचारप्रणाल्या यांना कवेत घेऊन त्यांच्या पलीकडे जाणारी असते.

म्हणूनच श्री. कदमांचे हे पुस्तक महत्त्वाचे ठरते. त्यात जे काही आहे, ते त्याच्या परीने चांगले आहेच आहे; पण त्यात जे काही असावे असे वाटते, त्याच्याकडे जाण्यासाठी हे पुस्तक एक पायवाटही करून देते.

*रा.ग. जाधव*

---

**माझ्या सार्वजनिक जीवनाची बखर** – डॉ. शरच्चंद्र गोखले; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९९; रु. २५०/-.

---

'गरीब, दलित व अनाथ यांच्याबद्दल केवळ कणव व दया असून भागत नाही, तर ज्या समाजामध्ये तुम्हांला परिवर्तन घडवून आणायचे आहे, समाजातील जी दुखणी दूर करायची आहेत ती मुळात उद्भवणारच नाहीत, अशी समाजरचना निर्माण करण्यासाठी सामाजिक संबंधांचा तसेच राजकीय व सामाजिक संदर्भाचा आणि समाजरचनेच्या जडणघडणीचा शास्त्रीय अभ्यास व विचार केला पाहिजे,' (जे.सी. कुमारप्पा) या विचाराने प्रेरित होऊन आयुष्यभर समाजकल्याणाच्या कार्याला वाहून घेतलेल्या डॉ. शरच्चंद्र गोखले यांनी आपल्या सार्वजनिक कार्याचा व कार्यासंदर्भातील चिंतनाचा आढावा *माझ्या सार्वजनिक जीवनाची बखर* या पुस्तकात घेतला आहे. पत्रकारितेचा वडिलांकडून मिळालेला वारसा व आवड असूनसुद्धा अगदीच 'बेभरवशा'च्या समाजकार्याची निवड त्यांनी त्या काळी केली. शास्त्रीयदृष्ट्या विचार करून व्यवस्थितपणे नियोजन केल्यास समाजकल्याण व समाजविकास यासारख्या क्षेत्रांतही भरीव कामगिरी करता येणे शक्य आहे, याचा प्रत्यय पुस्तक वाचताना जाणवतो. भान राखून योजना आखल्या पाहिजेत व बेभान होऊन त्या अंमलात आणायला हव्यात, याप्रमाणे हयातभर त्यांनी कार्य केले आहे.

आपल्या सार्वजनिक जीवनाचा आढावा घेताना डॉ. गोखले, तरुण वयात ते संपर्कात आलेल्या, अच्युतराव पटवर्धन, काकासाहेब गाडगीळ, कॉम्रेड डांगे, केशवराव जेधे, प्रा. स.वा. कोगेकर इत्यादी प्रमुख विचारवंतांच्या प्रभावाचा आवर्जून उल्लेख करतात. गांधीवादी व मिशनरी कार्यकर्त्यांच्या कार्याचेही त्यांना आकर्षण वाटे. या सर्वांच्या प्रभावामुळे मुंबई येथील टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस या संस्थेत लेखकाने स्नातकोत्तर शिक्षण घेतले. याच काळात पाकिस्तानातून आलेल्या निराश्रितांच्या पुनर्वसनाचा प्रत्यक्ष अनुभव त्यांना मिळाला.

शिक्षण संपवल्यानंतर गोखले यांनी समाजकल्याण खात्यात नोकरी पत्करली. त्या काळी समाजकल्याणाचा भर कायदा व सुव्यवस्थेवर ठेवला होता. त्यासाठी गुन्हेगार जमातीवर निर्बंध लादणारा कायदा, भिक्षाप्रतिबंधनाचा कायदा किंवा अनाथ निराधार मुलांना कोर्टापुढे आणायला लावणारा कायदा हा समाजकल्याणाचा भाग मानला गेला होता. हे सर्व कायद्याचे इलाज वरवरचे आहेत, त्यामुळे मूळ प्रश्नांना बगल दिली जाते याची जाणीव झाल्यामुळे सरकारी नोकरीत असूनसुद्धा गोखले यांनी खात्याची ध्येय-धोरणे बदलण्याचा सातत्याने प्रयत्न केला. या देशातील सर्व सामाजिक प्रश्नांना दारिद्र्याची आणि विषमतेची चौकट असल्याने हे थातरमातुर उपाय कामाचे नाहीत, त्यासाठी नवीन विकासतंत्र आत्मसात करायला हवे, असे त्यांना वाटत होते.

नोकरीच्या निमित्ताने गोखले यांना उन्मार्गी मुले, भिकारी, अपंग, कुष्ठरोगी, हिजडे अशा समाजातील उपेक्षितांमध्ये प्रत्यक्षपणे काम करण्याचा अनुभव मिळाला. ब्रिटिशांच्या काळी समाजातील उपेक्षितांना दाखल करण्यासाठी रिमांड होम, बेगर्स होमसारख्या संस्था स्थापन करण्यात आल्या होत्या. तीच



अनुक्रमणिका

परंपरा स्वातंत्र्योत्तर काळातही पुढे चालवली गेली होती. 'प्रश्न उपेक्षित मुलांचा असो, पतित स्त्रियांचा असो, वृद्धांचा असो, अपंगांचा असो वा भिकाऱ्यांचा असो, संस्थांच्या रेफ्रिजरेटर-मध्ये एकदा सामाजिक प्रश्न गोठला म्हणजे समाजाची जबाबदारी संपली, असे समजले जात असे.' परंतु अशा उपेक्षितांमध्ये कार्य करताना केवळ मायाळू अंतःकरण असून चालत नाही. त्यासाठी शास्त्रीय ज्ञानाची जोड असली पाहिजे, हे स्वतःच्या अनुभवावरून गोखले यांनी सिद्ध केले. व्यावसायिक ज्ञान व समाजविकासाची बांधिलकी हे एकत्र आल्यामुळे अगदी प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा काम करता येते, हे पुस्तक वाचताना कळते.

अनाथ बालकांच्या संदर्भात अनेक प्रश्नांची चर्चा लेखकाने केली आहे. प्रथमतः मूल म्हणजे मोठ्या माणसाची छोटी आवृत्ती असे समजू नये, त्यालाही स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असते, याची जाणीव ठेवली पाहिजे असा लेखकाचा आग्रह आहे. 'उन्मार्गी मुलांच्या बाबतीत घरची शिक्षण-पद्धती, परिस्थिती, आईबापांची वागणूक, मित्रांची संगती, प्रलोभन, गरज वगैरे अनेक कारणे त्यांच्या उन्मार्गीपणाला जबाबदार असतात.' परंतु समाज मात्र ती समस्या अस्तित्वातच नाही अशा प्रकारे बेजबाबदारपणे वागत असतो. मूल हे प्रेमावर जगणारे आहे हे आईला कळते. पण 'हाऊसमदर'ला समजत नाही. ७-८ वर्षांच्या मुलांना हॉस्टेलमध्ये ठेवून शिक्षण देण्याचा प्रयत्न करणारे उच्च मध्यमवर्गातील आईबाप याचा बोध घेतील अशी अपेक्षा आहे. बालपण हरवलेल्या मुलांचे व्यक्तिमत्त्व वेगळेच बनते, अशी मुले अकालीच प्रौढ होतात, ही लेखकाची खंत आहे. म्हणूनच लेखकाला पालकत्वाचे शिक्षण जरूरीचे वाटते.

नोकरीच्या काळात गोखले यांना काही काळ चेंबूर येथील कुष्ठरोग्यांच्या संस्थेतही काम करावे लागले. कुष्ठरोग्यांकडे एक माणूस म्हणून न पाहता एक 'केस' म्हणून पाहण्याची संकुचित दृष्टी अशा संस्थेच्या संबंधितांमध्ये निर्माण झालेली असते. समाजातील या संवेदनाहीनतेवर लेखकाने बोट ठेवले आहे. कुष्ठरोग्याबद्दल समाजात असलेल्या गैरसमजाबद्दल, तिटकाऱ्याबद्दल विस्तृतपणे लेखकाने लिहिले आहे. चेंबूरच्या संस्थेत कुष्ठरोग्याव्यतिरिक्त अपंग, धडधाकट, वृद्ध, स्त्रिया, मुले इत्यादींना पोलिस भिकारी म्हणून पकडून आणून सोडत. रस्त्यावरच्या माणसांना गुन्हेगार ठरवणाऱ्या या कायद्यावर व अशा प्रकारचे निष्ठुर कायदे पास करणाऱ्या सत्ताधारीवर्गावर लेखकाने आपला राग व्यक्त केला आहे. 'दारिद्र्याच्या, कुष्ठरोगाच्या वा अनाथ-अपंगपणाच्या आसुडाखाली झोडपली गेलेली ही माणसे रस्त्यावर आली म्हणून त्यांना गुन्हेगार ठरवणे हा काही उपाय नव्हे'. कायद्याने समजात आमूलाग्र परिवर्तन होऊ शकते हा एक भ्रम आहे असे लेखकाला वाटते.

भीक मागणाऱ्यांच्याबद्दल विचार करताना लेखकाच्या मनात अनेक प्रश्न उभे राहतात : माणूस भीक तरी का मागत असेल? आपल्याला एखादी वस्तू उसनी मागायची असेल तर किती ओशाळवाणे वाटते. मग सारी लाज सोडून, सारा स्वाभिमान टाकून आपल्या व्यक्तिमत्त्वाचा नायनाट करत ही माणसे रस्त्यावर एकेक पैसा मागत कशी उभी राहत असतील? साऱ्या वेदना, यातना आणि विरूपता यांचे जे लाजिरवाणे प्रदर्शन रस्त्यावर मांडले जाते त्यात सत्य किती आणि नाटक किती? समाज जर या प्रश्नांचे उत्तर न शोधता केवळ दयाबुद्धीने शिळेपाके अन्न त्यांच्या पदरात टाकून सामाजिक जबाबदारी झटकत असेल तर डाव उलटण्याची शक्यता आहे, असा इशारा लेखक देतो. अन्नाच्या एकेका घासासाठी तासन्-तास रांगा लावून बसलेल्या माणसांना परिस्थितीने लाचार केलेले असते. ही माणसे कुठल्या थराला जाऊ शकतील याचा नेम नाही. म्हणून त्यांच्याकडे जळते निखारे म्हणूनच बघायला हवे असा धोक्याचा इशारा गोखले देतात.

भारतीय समाजकल्याण संस्थेचा कार्यकारी सचिव आणि आंतरराष्ट्रीय समाजकल्याण मंडळाचा आशिया व पॅसिफिक विभागाचा प्रमुख म्हणून काम करताना या क्षेत्रातील अनेक नामवंतांचा परिचय लेखकाला झाला. संशोधन व अनुलेखन यांची गरज किती आहे याचा आढावा लेखकाने या निमित्ताने घेतला आहे. विकासाची व्याख्या करताना तो पैशामध्ये न करता सर्वसामान्यांना विकासाची संधी कितपत मिळते व त्याचा उपयोग कितपत होतो यावर विकासाची मोजमापे ठरवावीत असे लेखकाला वाटते. अडचणीत असलेल्या एकट्या-दुकट्या व्यक्तीचे प्रश्न सोडवणे नेहमी सोपे असते. त्या कामाची पावतीपण लगेच मिळते. परंतु शासनाचे धोरण बदलणे वा धोरणाला नवी दिशा देणे फार जिकिरीचे असते. ही अत्यंत सावकाश घडणारी प्रक्रिया आहे. शिवाय प्रस्थापिताच्या बाजूने असलेली, कुठलाही बदल न स्वीकारणारी सुस्त नोकरशाही कायम विरोध करत असते. अशा प्रतिकूल वातावरणातसुद्धा

लेखकाने काही महत्त्वाचे बदल घडवून आणल्याचा प्रत्यय पुस्तक वाचताना येतो.

ज्येष्ठ नागरिकांच्या न्याय्य हक्कांसाठी त्यांनी केलेल्या प्रयत्नांची चर्चा पुस्तकात आहे. वृद्धांच्या सुविधांकडे समाजकल्याण म्हणून न पाहता राष्ट्रीय कर्तव्य म्हणून पाहावे असे लेखकाला वाटते. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय धोरणे घडवताना ती राववण्याची जबाबदारीपण धोरणे ठरवणाऱ्यांनी घेतली पाहिजे. वंचित झालेल्यांचे तातडीचे प्रश्न प्रत्यक्ष काम करून सोडवणे हेही महत्त्वाचे आहे. दया-दान यापेक्षा स्पॉन्सरशिप ही समाजकल्याण कार्यातली नवीन संकल्पना आहे हे ओळखून कम्युनिटी एड अँड स्पॉन्सरशिप प्रोग्राम (कास्प किंवा 'समाजविकास साह्य आणि प्रतिपादन कार्यक्रम') या नावाच्या राष्ट्रीय संस्थेची स्थापना करण्यात लेखकाचा सिंहाचा वाटा आहे. स्पॉन्सरशिप म्हणजे दान वा उपकार नसून सामाजिक काम करण्याची नियोजनबद्ध पद्धती म्हणून त्याकडे बघायला हवे, असे लेखकाला वाटते. अनाथ, अपंग मुलांसाठी अन्न, निवारा व शिक्षणासारख्या मूलभूत सुविधा पुरवून त्यांना आत्मनिर्भर करण्यासाठी ही संस्था मदत करत आहे.

समाजकल्याणाच्या कार्याबरोबरच गोखले यांनी दैनिक 'केसरी'चे संपादकपद काही वर्षे सांभाळले. त्या काळात त्यांना आलेल्या अनुभवांच्याबद्दलही एक प्रकरण खर्ची घातले आहे. राजीव गांधी, काउंट लिंडबर्ग, माजी राष्ट्रपती वेंकटरामन, शंतनुराव किर्लोस्कर, 'स्वाध्याय'चे आठवले, मदर तेरेसा इत्यादी... मान्यवरांचा परिचय याच सुमारास झाला. त्यांचे मार्मिक चित्रण लेखकाने केले आहे. लेखकाला आलेल्या विविध अनुभवांचे वर्णनपण या पुस्तकात आहे. समीर घोपसारखी व्यक्ती जिद्दीने आपल्या अपंगत्वावर मात करून सुखी आयुष्य जगत आहे, याचे वर्णन आपल्याला सुखद धक्का देते. व्यक्तिचित्रणाचे व अनुभवकथनाचे एक स्वतंत्र पुस्तकच हवे, असे वाटते.

साचेबंद आयुष्याच्या मागे न लागता उपेक्षितांमध्ये आशावाद व जिद्द निर्माण करण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचा, त्यामागील चिंतनाचा आढावा लेखकाने घेतला आहे. सामाजिक कार्य करू इच्छिणाऱ्या तरुणांपुढे नेहमी संघर्षात्मक कार्य की सेवाभावी कार्य असा प्रश्न उभा राहत असतो. आपापल्या कुवतीप्रमाणे त्याचे उत्तर शोधले जाते. गोखले यांनी दुसरा मार्ग पत्करून त्यातही भरीव कामगिरी केली आहे. या प्रकारच्या कार्याला शास्त्रीय बैठक असून नियोजनपूर्वकपणे काम करणे शक्य आहे हे त्यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे. 'कोणत्याही समाजाच्या सांस्कृतिक उंचीबाबत विचार करताना त्या समाजात निरोगी, अव्यंग, शक्तिशाली नागरिकांना कोणती वागणूक मिळते यापेक्षा अनाथ, अपंग व नावडत्या नागरिकांच्याकरता काय व्यवस्था केली आहे, त्यांना कोणती वागणूक मिळते यावरूनच त्याचे श्रेष्ठत्व ठरवायला हवे' असे वाटणाऱ्या लेखकाने उपेक्षितांच्या सेवेला जीवनमूल्य मानल्यामुळे त्यांच्या या बखरीला वेगळा अर्थ प्राप्त झाला आहे.

*प्रभाकर नानावटी*

---

**निमित्ताच्या निमित्ताने** – प्रभाकर बागले; साहित्यसेवा प्रकाशन, औरंगाबाद, १९९८; रु. १५०/-.

---

प्रा. प्रभाकर बागले यांच्या एकूण सतरा लेखांचा हा साहित्यविचार जिज्ञासू अभ्यासक व चोखंदळ रसिक यांना स्वागतार्ह वाटेल. या सतरा लेखांपैकी अकरा लेख *अनुष्टुभ* मासिकातून साधारणपणे १९७८ ते १९९६ च्या दरम्यान प्रसिद्ध झालेले आहेत. 'कवितारती' हे, दै. 'सकाळ' (पुणे) तसेच काही विशिष्ट ग्रंथ यांतून इतर उर्वरित लेख प्रसिद्ध झालेले आहेत. स्थूलमानाने प्रा. बागले यांची ही एकूण समीक्षा १९८० नंतरच्या कालखंडातील आहे. विषयदृष्टीने पाहता १९८० पूर्वीच्या कालखंडातील कुसुमाग्रज, विंदा करंदीकर, इंदिरा संत, बोरकर, कांत, पु.शि. रेगे, बाबुराव बागूल, लक्ष्मण माने, विश्राम बेडेकर यांसारखे साहित्यिक व/वा त्यांच्या साहित्यकृती लेखकाने निवडलेल्या आहेत. अरुण साधू, रा.रं. बोराडे, रंगनाथ पठारे, वसंत आबाजी डहाळे यांसारखे साहित्यिक व त्यांच्या साहित्यकृती या साधारणपणे १९८० नंतरच्या कालखंडातील आहेत. कवी व कविता यांसंबंधीचे सात लेख, नाटकासंबंधीचे चार लेख, कथेसंबंधी तीन लेख, आत्मचरित्राविषयी दोन लेख व एक तात्त्विक म्हणता येईल असा लेख, असे या समीक्षालेखांचे वर्गीकरण करता येईल.

प्रा. प्रभाकर वागले हे काही काळपर्यंत *अनुष्टुभ* मासिकाचे संपादक होते. संपादकीय लेखनाचे निमित्त हे त्यांच्या या पुस्तकातील वहुसंख्य लेखांचे कारण असल्याने प्रस्तुत लेखसंग्रहास 'निमित्ताच्या निमित्ताने' हे नाव मुक्रर केले, असे त्यांनी आपल्या प्रास्ताविकात म्हटले आहे. प्रा. वागले यांच्या या पुस्तकातील एकूणच समीक्षेमागे एक खास दृष्टिकोन आहे; एक विशिष्ट परिप्रेक्ष्य आहे. हा दृष्टिकोन म्हणजे साहित्यातील प्रयोगशील प्रतिभारूपांचा वेध घेणे, हा होय. आपल्या प्रास्ताविकात प्रा. वागले लिहितात : "या सर्व लेखकांचे प्रयोगशील संवेदन मला मोलाचे वाटते. कारण आपल्या जीवनविषयक दृष्टीला, तिच्या असांकेतिक आकलनाला त्यांनी आपल्या कलाकृतीत शव्दवद्ध केलेले आहे." अशा लेखकांच्या कलाकृतींना सादर होऊन त्यांच्या आस्वादाला शव्दरूप देण्यात आनंद असतो; तसेच अशा आस्वादक समीक्षेतून समाज, साहित्य, संस्कृती यांच्यामधील परिवर्तनशील नात्याची थोडी ओळखही करून घेता येते, असेही या लेखकाने नमूद केलेले आहे. प्रा. वागले यांच्या समीक्षेचे स्वरूप लक्षात घेण्यासाठी त्यांनी स्वीकारलेली ही भूमिका आपणांस मार्गदर्शक ठरते. साधारणपणे १९४० नंतरच्या गेल्या साठ वर्षांतील मराठी साहित्यात काही प्रयोगशील प्रतिभारूपांचे जे दर्शन लेखकाला घडले, त्याचे स्वरूप व मर्म स्पष्ट करण्याचा लेखकाचा हेतू आहे व प्रयत्नही आहे. ही भूमिका निर्विवादपणे स्वागतार्ह व महत्त्वाची मानावी लागेल.

सुमारे दोनशे पृष्ठांतील या आस्वादक समीक्षेचा पुरेपूर विचार करावयाचा तर पुन्हा अशा विचारपरीक्षणासाठी तेवढ्याच पृष्ठांचा आस्वाद शव्दवद्ध करावा लागेल. थोडेसे गमतीने बोलावयाचे, तर असे म्हणता येईल की, *अनुष्टुभ*-संप्रदाय (-- की ज्या संप्रदायात या पुस्तकाचे कर्ते मोडतात – ) हा प्राधान्याने समीक्षेचा संप्रदाय आहे व तो लांवण लावण्यास भाग पाडणारा संप्रदाय आहे. म्हणजे एका समीक्षाकृतीच्या मागोमाग अनेक निमित्तांनी जाण्यासाठी वाचक प्रवृत्त होतो : इंग्रजीतील अद्ययावत वा अज्ञात समीक्षा व समीक्षक, सुबोध मराठीकरण, विश्लेषणाच्या पिंजणप्रक्रियेतून वाट काढणे, आपल्या विचारांच्या सवयींना मिळणारे वा लागणारे धक्केबुक्के सहन करणे, वगैरे. *सत्यकथा*-संप्रदायाने लेखक-कवींपुढे एक न्यूनगंड निर्माण करणारा दरारा उभा केला, असे म्हणतात. *अनुष्टुभ*-संप्रदायाने साहित्याच्या अभ्यासक-रसिकांपुढे तशाच प्रकारचा दरारा जणू खडा केला. एकूण काय, तर स्वातंत्र्योत्तर अर्धशतकातील 'पहिली निम्मी वर्षे' मराठी लेखक-कवी व उर्वरित अर्धी वर्षे अभ्यासक-समीक्षक हे दोन मासिकांच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष दडपणाखाली (की दहशती-खाली?) वावरत आले, असे गमतीने म्हणता येईल.

या पुस्तकातील प्रयोगशील प्रतिभारूपांचे विवेचन कविता, नाटक, कथा आणि आत्मचरित्र या चार साहित्यप्रकारांतील आहे. कुसुमाग्रजांच्या काव्यातील वैभूतिक संवेदन, विंदा करंदीकरांचे व्रतस्थ प्रयोगशील आत्मभान, इंदिरा संतांच्या भावरूप स्पंदनांचा पैस, बोरकरांच्या कवितेतील राधेची प्रतिमा, कांतांच्या संवेदनशीलतेचा परीघ आणि वसंत आवाजी डहाके यांच्या *शुभवर्तमान* या काव्यसंग्रहातील अशुभ-वर्तमानाचा वेध हे वागले यांच्या आस्वादक समीक्षेचे विषय आहेत. नाटकांच्या संदर्भात लेखकाने वि.वा. शिरवाडकरांच्या *नटसम्राट* नाटकातील प्रयोगशीलतेचा वेध कल्पनाशील आत्मभान व औपरोधिक आत्मभान यांच्या द्वंद्वामधून घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. राजकीय नाटकाच्या संभवनीय आकृतिबंधाचे स्वरूप *आमदार सौभाग्यवती* या रा.रं. बोराडे यांच्या नाटकाच्या संदर्भात स्पष्ट केले आहे. पु.शि. रेग्यांच्या नाटिकांचे विश्लेषण करीत काव्यात्म नाटकाचा रूपवंध समजावून देण्याचा प्रयत्न केला आहे. अमेरिकेतील निग्रोंच्या काळ्या रंगभूमीचा परामर्श घेऊन मराठीतील दलित रंगभूमीला उद्‌वोधक ठरणारे विचार स्पष्ट केले आहेत. कथेच्या क्षेत्रातील वाबुराव वागुलांच्या कथासृष्टीतील क्रांतिविज्ञान म्हणजे नेमके काय, ते उलगडून दाखविले आहे. अरुण साधू व रंगनाथ पठारे यांच्या कथासमष्टीतील वास्तवाच्या असांकेतिक सर्जनशील आत्मभानाचे स्वरूप विशद केलेले आहे. विश्राम वेडेकरांचे *एक झाड आणि दोन पक्षी* हे आत्मचरित्र व लक्ष्मण माने यांचे *उपरा* हे आत्मकथन आत्मपर लेखनाच्या रूढ संकेतव्यूहावाहेर कशी जातात तेही खुलासेवार दाखवून दिले आहे. 'संस्कृती आणि सर्जन' हा या पुस्तकातील अखेरचा लेख. त्यात सध्याच्या औद्योगिक-वैज्ञानिक, संगणकीय व माहिती-तंत्रज्ञानाच्या प्रभावकाळातील भाषिक व सर्जनशील आत्मभानाचे प्रश्न नेमकेपणाने अधोरेखित करणारे विवेचन केलेले आहे. हे सर्व लेखन वाचल्यानंतर आपली साहित्यविषयक जाण निर्विवादपणे समृद्ध व डोळस होते असा माझा तरी अनुभव आहे. मनुष्यजीवनातील वास्तवता आणि त्या वास्तवतेच्या विविध रंगरूपांचा अर्थपूर्ण वेध घेणारे प्रतिभावंतांचे सर्जनशील आत्मभान यांच्यातील नानाविध संबंधांची प्रारूपे या विवेचनातून








आपणांस परिचित होतात. मुख्य म्हणजे साहित्यकृतीची स्वायत्तता अबाधित राखून त्या स्वायत्ततेच्या सामाजिक-सांस्कृतिक लक्षणीयतेचा या लेखकाने घेतलेला तर्कसंगत बौद्धिक परिभाषेतील आस्वादक धांडोळा मोठा विचारप्रेरक आहे. मराठीतील जीवनवादी व कलावादी अशा दोन्ही प्रकारांतील आस्वादक समीक्षांचा रूढ व ढोवळ संकेतव्यूह कालबाह्य झालेला आहे याची प्रकर्षाने जाणीव करून देण्याचे कार्य प्रा. वागले यांच्या या समीक्षेने पार पाडले आहे. त्याचप्रमाणे जीवनमूल्ये आणि कलामूल्ये यांचा प्रतिभावंतांनी आपल्या निर्मितीमधून जो एकात्म मेळ साधलेला असतो तो नेटकेपणाने कसा उलगडून दाखविता येतो, याचाही एक पाठ या समीक्षेतून उपलब्ध होऊ शकतो. तर्कसंगत आकलन व विश्लेषण यांच्या काटेकोर शिस्तीला डावलून भरकटणारी आस्वादक समीक्षा मराठीत मोठ्या टीकेचा विषय ठरली हे सर्व अभ्यासक जाणतातच त्यात तथ्यही आहेच. तथापि समुचित समीक्षादृष्टीची काटेकोर शिस्त पाळणारी अत्यंत उद्‌बोधक आस्वादक समीक्षाही मराठीत कमी नाही. याच प्रवाहात प्रा. वागले यांची ही समीक्षा मोडते. 'एकला चलो रे' या वृत्तीने आता जीवनवादी आणि रूपवादी अशा दोन्ही पंथांतील आस्वादकांना समीक्षाक्षेत्री वाटचाल करणे फलदायी ठरणारं नाही. *अनुष्टुभ*-संप्रदायाने सर्वसाधारणपणे आणि प्रा. वागले यांनी व्यक्तिगतपणे ही गोष्ट अधोरेखित केली आहे.

ही समीक्षा काही शंका, काही प्रश्नही आपल्या मनात निर्माण करते. वाचकपरत्वे अशा प्रश्नोपप्रश्नांची संख्या व गुणवत्ता वेगवेगळ्या प्रकारची असणारच. पारिभाषिक शैलीचा वरचष्मा, अमूर्त विचार-विधानांची तर्काच्या वाटेने चाललेली वेगवान दौड, ऐतिहासिक, तौलनिक व दृष्टांतवजा संदर्भांच्या बेताच्या उपयोगामुळे विवेचनातून गळून जाणारी सुबोधता, वैचारिक सूत्रांच्या ताठर प्रभावाखालील विमर्शातून साधलेली सर्वंकष पण कुठेतरी कमतरता जाणवणारी आकलन-व्यवस्था, प्रयोगशील सर्जनशीलता व मनुष्यजीवनाचे वास्तव यांच्या नात्यासंबंधी कळत-नकळतपणे गृहीत धरलेल्या काही मूल्यकल्पना यांसारख्या काही बावी हे पुस्तक वाचताना व वाचून संपविल्यानंतर मनात रेंगाळत राहतात. काही विचार, काही मुद्दे हे नेहमीच्या भाषेतून सुबोधपणे व्यक्त होऊ शकतात असे जसे मनात येते, त्याचप्रमाणे काही उघड व सर्वपरिचित विचार परिभाषेतून सांगितल्यामुळे प्रथमदर्शनी वेगळे वाटले, तरी तो भास असल्याचे नंतर लगेच लक्षात येते. आधुनिक मराठी समीक्षेवरील पश्चिमी साहित्य-समीक्षेचा प्रभाव उत्तरोत्तर वाढतच गेल्याचे दिसते. असा परकीय प्रभाव ज्याप्रमाणे अपरिहार्य स्वीकार ठरतो, त्याचप्रमाणे स्वीकारानंतरचे त्याचे आत्मसाती-करण व सादरीकरण हेही अपरिहार्य मानणे इष्ट ठरते. पश्चिमी प्रभावाखालील आधुनिक समीक्षा पुष्कळदा देशीपण हरवून बसते. या लेखकाचा मराठी व इंग्रजी साहित्याचा व्यासंग व्यापक व मर्मग्राही आहे, हे या पुस्तकातील अनेक निर्देशांतून सहजपणे लक्षात येते. हा लेखक इंग्रजीतून विचार करतो हेही जाणवते. हे असे जाणवावे की नाही, हा या प्रकारच्या समीक्षेतील एक प्रश्न असावा असे वाटते. विचार-सूत्रांच्या प्रभावाखालील ही आस्वादक समीक्षा एवढी निर्विवाद व एवढी चक्क लखलखीत ठरते, की कलासाहित्याची समीक्षा एवढी अशी नखशिखांत पारदर्शक व निर्णायक ठरावी किंवा नाही, असाही प्रश्न मनात डोकावून जातो. गंमत अशी की, प्रा. वागल्यांच्या टोकदार विचारसूत्रांनाच एक मोहक सौंदर्यमूल्य प्राप्त होते. याचा फायदा त्यांच्या समीक्षेला होतो व मुळात सौंदर्यमूल्य नसलेल्या समीक्षा-विषयाला कधीकधी जादा न्याय वा कलता न्याय मिळून जातो. मात्र या प्रकारचे काही स्पष्ट, काही संदिग्ध किंवा काही व्यक्तिगत अभिरुचीशी निगडित असे प्रश्नोपप्रश्न प्रा. वागले यांची समीक्षा निर्माण करते, ही बाब त्यांच्या समीक्षेचा दोष नसून गुणच मानला पाहिजे. साहित्याप्रमाणे समीक्षेचाही विकास नवे नवे प्रश्न उपस्थित करण्याच्या प्रक्रियेतूनच होत असतो, हे आपण जाणतोच.

प्रा. वागले यांची ही समीक्षा खोल पाण्यात उतरणारी आहे, हे तिचे वैशिष्ट्य होय. या समीक्षेच्या सूक्ष्म परिशीलनातून प्रयोगशील प्रतिभारूपांसंबंधीचे मोठे उद्‌बोधक व अभिनव सिद्धांतन करता येईल. या दृष्टीने कुणीतरी प्रयत्न करावा असेही मनापासून वाटते. सामान्यपणे ही समीक्षा समकालीन साहित्याची आहे व अशी समीक्षा खूपच अवघड व गुंतागुंतीची असते हे स्पष्टच आहे. समकालीन वास्तवता व साहित्य यांच्यापासून पुरेसे अलग होणे कठीण असते. त्याचप्रमाणे समीक्षकाच्या काही खास आवडीनिवडी समकालीन साहित्यातून गुंतलेल्या असतात. समग्रतेचे परिप्रेक्ष्यही समकालीन समीक्षकाला सापडणे व सज्ज करणे सोपे नसते. तथापि प्रा. वागले यांनी अशाही मर्यादांत सिद्ध केलेली ही आस्वादक समीक्षा महत्त्वाची आहे. कल्पनाशील संज्ञा किंवा आत्मभान आणि औपरोधिक



अनुक्रमणिका

संज्ञा, मूल्यभानाची मानसिकता, कल्पिताची गरज, विद्रोही संवेदनशीलतेचा पेच, कथेतील निवदेक व भाष्य यांचे महत्त्व, स्व, स्वेतर व स्वातीत यांचे निर्मितीमधील स्वरूप व कार्य, मिथकांचा सर्जनशील आविष्कार, काव्यात्मता व कल्पित यांचे एकूणच साहित्यनिर्मितीमधील माहात्म्य यांसारख्या कितीतरी सूत्रांचा चांगला वोध ही समीक्षा करून देते. प्रा. वागले यांच्या लेखांतून 'अभिजात रसज्ञता आणि वैचारिक विश्लेषण' या दोहोंचा मेळ प्रत्ययाला येतो, असे या पुस्तकाच्या पाठराखणीत म्हटले आहे ते योग्यच आहे. एक चांगली आस्वादक समीक्षा जिज्ञासूंना या पुस्तकरूपाने प्राप्त झाली आहे. त्यांना ती श्रीमंत आस्वादक बनण्यास उपयुक्त ठरेल, यात शंका नाही.

*रा.ग. जाधव*

---

**निळोबांची अभंगवाणी : आकलन व आस्वाद – यशवंत साधु; वै. शंकरमहाराज खंदारकर विश्वस्त संस्था, उदगीर, १९९८, रु. १२०/-.**

---

उदगीर येथील महाराष्ट्र उदयगिरी महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक डॉ. यशवंत साधु यांनी संत निळोबाराय यांच्यावर पीएच्.डी. पदवीसाठी प्रबंध लिहिला. या प्रबंधाचे संस्करण *निळोबांची अभंगवाणी : आकलन व आस्वाद* या नावाने प्रस्तुत पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहे. वारकरी संप्रदायातील शेवटचे मान्यवर संतकवी म्हणून निळोबाराय ओळखले जातात. मात्र त्यांचे जीवन, कार्य आणि काव्य यांसंबंधी चिकित्सक संशोधन-विवेचन करणारा ग्रंथ आजवर उपलब्ध नव्हता. डॉ. साधु यांचा प्रस्तुत ग्रंथ या दृष्टीने अभ्यासकांना स्वागतार्ह वाटेल. आपल्या वाङ्मयेतिहासाचा समग्र असा साकल्याचा प्रदेश अजूनही आपणांस पुरेपूर ज्ञात नाही, ज्ञात नव्हता या वस्तुस्थितीची तीव्र जाणीवही प्रस्तुत ग्रंथ करून देतो.

डॉ. साधु यांनी निळोबांसंबंधीचे उपलब्ध असे सर्व साहित्य काळजीपूर्वक पाहिले आहे आणि काही साहित्य – उदा., 'तुकारामस्तुती' सारखी प्रदीर्घ श्लोकरचना – नव्याने संशोधून पहिल्यांदाच प्रकाशात आणले आहे. त्याचप्रमाणे वारकरी संप्रदाय आणि निळोबांसंबंधीची पूर्वकालीन चिकित्सा यांचेही उपलब्ध असलेले संदर्भवाङ्मय अभ्यासिले आहे. प्रस्तुत पुस्तकातील एकशे एक पृष्ठांच्या प्रदीर्घ प्रस्तावनेतून लेखकाने निळोबांच्या चरित्र-चारित्र्याची, सांप्रदायिक कामगिरीची व काव्यनिर्मितीची चांगली चर्चा केलेली आहे. पुढील सुमारे एकशे तीस पाने निळोबांच्या रचनांचे आकलन व आस्वाद सादर करण्यात खर्ची घातलेली आहेत. त्यापुढील पंधराव्या प्रकरणात निळोबांची काही अप्रकाशित कविता दिलेली आहे. शेवटच्या सोळाव्या प्रकरणात आधारभूत साहित्याची सूची दिलेली आहे. याखेरीज पुस्तकाच्या प्रारंभी पाच रंगीत छायाचित्रे दिलेली असून त्यात निळोबांचे कीर्तन करतानाचे चित्र, त्यांची पिंपळनेर येथील समाधी, त्यांची अभंगांची हस्तलिखिते इत्यादींचा समावेश आहे. उपलब्ध संदर्भसाहित्याचा विचार करता, डॉ. साधु यांनी निळोबारायांचा सर्वांगीण असा उद्बोधक परिचय करून दिला आहे, असे म्हणता येईल. त्याचप्रमाणे वारकरी संप्रदायाच्या इतिहासाच्या दृष्टीनेही काहीशा उपेक्षित व अपुऱ्या राहिलेल्या अंगाची परिपूर्ती या पुस्तकामुळे होत आहे.

डॉ. साधु यांच्या प्रस्तुत मांडणीतून संत निळोबा यांच्या जीवनकार्यासंबंधी जे चित्र माझ्यासारख्या जिज्ञासू वाचकाच्या मनात उभे राहते, त्यातून काही प्रश्नही चुळबुळ करू लागतात. या प्रश्नांचे थोडक्यात दिग्दर्शन एवढ्याचसाठी करावयाचे, की त्यासंबंधी डॉ. साधु हेच आपणांस उद्बोधन करू शकतील.

एक प्रश्न असा की, निळोबारायांचे ७७ वर्षांचे प्रदीर्घ जीवन हे सापेक्षतः बरेचसे सरळ, निष्कंटक रेषेतील होते. फार मोठे आत्मसंघर्ष व बाह्यसंघर्ष त्यांच्या जीवनात दिसून येत नाहीत. याचे एक कारण, निळोबांच्या आगमनापर्यंत वारकरी जीवनमार्गाला लोकमानसात मिळालेली प्रतिष्ठा व मान्यता; दुसरे कारण, ब्राह्मण्याची अधिकारिता व तिसरे कारण निळोबांची वृत्ती. अंतर्बाह्य संघर्षांची उपक्रमशीलता हे कर्तृत्वाचे व नेतृत्वाचे लक्षण असते. निळोबारायात उपासकाची व रक्षणकर्त्याची भूमिका प्रभावी होती, संघर्षशीलतेची नव्हती. त्यांच्या जीवनाचा आकृतिबंध वारकरी संप्रदायातील संत एकनाथांच्या जीवनाशी अंशतः जुळतो; पण एकनाथकालीन मुसलमानी राजवट व निळोबाकालीन मराठा राजवट यामुळे त्यांत मोठा फरकही पडतो. ब्राह्मण्य आणि नेमस्त गृहस्थधर्म

हेही एकनाथ-निळोबा यातील समान घटक होत. भागवतधर्माच्या मंदिराचा कलशाध्याय १६४९ साली समाप्त झाल, म्हणजे या वर्षी तुकोबांचे वैकुंठगमन झाले. निळोबारायांचा संत म्हणून लौकिक १७१३ साली झाला; त्यावेळी ते सदतीस वर्षांचे होते. पुढे ते १७५३ पर्यंत म्हणजे सुमारे चाळीस वर्षे हयात होते. वारकरी संप्रदायाच्या संदर्भात व निळोबारायांच्या जीवनकार्याच्या दृष्टीने ही चाळीस वर्षे महत्त्वाची आहेत असे मला वाटते. या चाळीस वर्षांच्या सांस्कृतिक इतिहासाची नीट व सर्वांगीण मांडणी केल्याखेरीज निळोबांच्या सांप्रदायिक योगदानाचे यथार्थ आकलन होईलसे वाटत नाही. त्याचप्रमाणे या मांडणीत निळोबारायांच्या संतत्वपूर्व जीवनकालातील म्हणजे साधारणपणे १६५० ते १७१२ या साठ वर्षांच्या शिवशाहीतील वारकरी-संप्रदायाच्या स्थितिगतीचाही नेमका आलोक (पर्स्पेक्टिव्ह) स्पष्ट होणे इष्ट ठरेल. वारकरी संप्रदायात आत्मसाधना व समाजसाधना यांचा मेळ ज्ञानेश्वरांपासून तुकोबांपर्यंतच्या परंपरेत घातलेला दिसून येतो. या संतपरंपरेने सामाजिक वास्तवाशी सन्मुख असलेले परिवर्तनशील आत्मभान जागृत व सर्जनशील राखले होते. १७१३ ते १७५३ या पेशवाईच्या काळात जे सामाजिक-सांस्कृतिक वास्तव वदलत होते त्याचे संवेदन व सर्जनशील भान निळोबांच्या कार्यात व काव्यात कितपत उमटते, हे जाणून घेणे इष्ट ठरते. त्यामुळे एका बाजूने जसा निळोबांच्या कार्य-काव्याचा अर्थ उलगडला जाईल, त्याचप्रमाणे दुसऱ्या बाजूने वारकरी संप्रदायातील गतिशील चैतन्यावरही प्रकाश पडू शकेल. या संप्रदायाने खरीखुरी उपेक्षा केली ती सामाजिक-सांस्कृतिक बदलत्या वास्तवाच्या आव्हानाची! अशी उपेक्षा त्या काळातील निळोबांसारख्या वारकरी संप्रदायाच्या सर्वमान्य उत्तराधिकाऱ्यानेही केली किंवा काय, हेही आपण जाणून घेतले पाहिजे. आणि असेच जर घडले असेल, तर या संप्रदायाने खरीखुरी उपेक्षा आपल्या स्वतःच्याच महान परंपरेची केली, असाच निष्कर्ष ाही का काढावा लागणार?

निळोबारायांनी 'ज्ञानोबा-तुकाराम' या नव्या मंत्राची दिशा वारकरी-संप्रदायाला दिली. या मंत्रातून ऐतिहासिकतेचे जे नवे भान गर्भित होते त्याचीही नेमकी मीमांसा होणे आवश्यक वाटते. तुकोबारूपी कलशाध्यायाजवळ या संप्रदायाची वीजभूत विकसनशीलता पूर्णत्वास जाऊन संपली; या पंथाचे ऐतिहासिक अवतारकार्य संपले. याचा अर्थ स्पष्ट होऊन वा करूनच निळोबांच्या कर्तृत्वाचे व कवित्वाचे मूल्यमापन अधिक यथार्थपणे होऊ शकेल, असे वाटते.

निळोबारायांच्या सरळ रेषेतील जीवनाचा व जीवनदृष्टीचा त्यांच्या सांप्रदायिक नेतृत्वावर कितपत परिणाम झाला? त्याचप्रमाणे तुकोबांसंबंधी त्यांच्या आकलनात कितपत समग्रता होती? तुकोबांना गुरू मानल्यामुळे त्यांच्या ब्राह्मण्यावर व त्यांच्या ब्राह्मण्याचा त्यांच्या सांप्रदायिक धुरावहनावर कितपत परिणाम झाला?

'पिंपळनेरचे प्रतिपंढरपूर' ही निळोबारायांची एक नवी संकल्पना होती (१७१३). वारकरी पंथाचे जे चैतन्यतत्त्व संभवते त्याच्या संदर्भात या नव्या संकल्पनेचे मूल्यमापन पंथ व निळोबाराय या दोहोंच्या यथार्थ आकलनासाठी करणेही उचित ठरावे.

हे सगळे प्रश्न केवळ एक जिज्ञासू म्हणून माझ्यासारख्याच्या मनात निर्माण होतात. कदाचित डॉ. साधूंसारखे या विषयातील निष्ठावान अभ्यासक हे सर्वच प्रश्न अप्रस्तुत आहेत असेही म्हणू शकतील. पण हे प्रश्न त्यांच्याच या अभ्यासपूर्ण पुस्तकाच्या वाचनातून जाणवले आहेत, हेही खरे आहे.

डॉ. साधु यांनी निळोबांच्या काव्यरचनेची चांगली आस्वादक समीक्षा सादर केलेली आहे. परंतु एकंदरीत निळोबा-काव्य सांप्रदायिक मूल्यचौकटीतच बंदिस्त आहे. आणि ते तसे असावे, हे बहुधा निळोबारायांनाही अभिप्रेत आहे. तरीदेखील 'प्रतिमांचे सौंदर्य' व 'भावकविता' या प्रकरणांतून डॉ. साधु यांनी केलेली समीक्षा नावीन्यपूर्ण आहे. निळोबारायांच्या निवडक रचनांचे एक चांगले संपादन डॉ. साधु करू शकतील व त्यातून निळोबांच्या काव्यगुणांची अधिक चांगली मांडणी ते करू शकतील. असो.

एका महत्त्वाच्या पण उपेक्षित संतकवीचे अद्ययावत ठरणारे चरित्र व काव्य सादर करून व त्यातून काही नव्या प्रश्नांचे भान आणून देऊन डॉ. साधु यांनी एक स्वागतार्ह व मोलाचे कार्य केले आहे. यासाठी त्यांचे अभिनंदन केले पाहिजे.

*रा.ग. जाधव*

८

**देशांतरीच्या गोष्टी सांगता – अजिता काळे; मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९९९; रु. १६०/-.**

या पुस्तकाचे तीन भाग पडतात. पहिल्या दोन प्रकरणात (२४ पृष्ठांत), बालपणच्या आठवणी. दुसऱ्या भागात (८४ पृष्ठांत) म्हणजे नंतरच्या तीन प्रकरणांत, १७-१८ वर्षांतील अमेरिकेतील तीन शहरांतील वास्तव्याचे अनुभव. तिसऱ्या भागात (१०८ पृष्ठांत), म्हणजे शेवटच्या तीन प्रकरणांत, रशिया, इजिप्त आणि ग्रीस या देशांतील प्रवासांचे वृत्तान्त आहेत.

पहिल्या भागात बालपणच्या हृद्य आठवणी आहेत. वेगळ्या विचारांचे आई-वडील, त्यांनी दिलेले संस्कार, स्वातंत्र्य याची ओळख आहे. 'मृत्यू म्हणजे काय?' विचारताच वडील तिला स्मशानात घेऊन जातात. मेंढरांसारखं इतरांच्या मागं न जाण्याची शिकवण तिला मिळते. संतति-नियमनाच्या क्लिनिकमध्ये पुढे लेखिका बरेच सेवा-कार्य करते त्यामागची प्रेरणा तिला घरीच लहानपणी मिळते. ही आस्था तिच्या अमेरिकेतील वास्तव्यातच नव्हे तर देशोदेशींच्या प्रवासातही शाबूत राहते. कुणी त्याबद्दल विनोद केला तरी तिला सहन होत नाही. आई-वडील, आजी-आजोबा, सासरे (के. नारायण काळे) यांची वैशिष्ट्ये मोजक्या शब्दांत-प्रसगांत ती मूर्त करते.

वडील आईला खूप बोलत. याबद्दल तिने आईला विचारले असता ती म्हणाली, 'ते गेल्यावर वाईट गोष्टी आठवत नाहीत, चांगल्या आठवतात. त्यांनी मला शिकवलं, धीट केलं, आत्मविश्वास दिला.' लेखिकेची उदार, जिज्ञासू, सेवाभावी, साहित्यप्रेमी वृत्ती, संवेदनशीलता जागोजागी आत्मकथनाला एक सुखद, नितळ, प्रसन्न रूप देते. सर्वच आत्मकथनात, प्रवासवृत्तातही मानवी संबंधांची ओढ, जीवनाची प्रगल्भ जाण अनुभवाला येते.

अमेरिकेत आल्यावर बेबीसिटिंगचं काम वर्षभर नाइलाजाने करावे लागते. त्यातील मनस्ताप, धावपळ आणि सुखद क्षण ती बारकाईने सांगते. लॉसँजलिस शहरातील विविध अनुभव – मेक्सिकनांचा गावात येणारा लोंढा, दोघांची काटकसर, स्त्रियांवरील अबॉर्शनचे प्रसंग, शाळेतील हिंसक मुले, शिक्षकांचे ब्रेकडाऊन होणे, तरुणांची व्यसनाधीनता – यांचा जवळून परिचय घडतो.

लुइव्हिल या दुसऱ्या शहरातील वास्तव्यात भारतीय डॉक्टरांचे, त्यांच्या कुटुंबीयांचे वेगवेगळे नमुने भेटतात. काटकसरी, स्वार्थी, अंधश्रद्धा इत्यादि स्वभाव उलगडत जातो. मुलांना वाढवणे, कोर्समधील अध्ययन-अध्यापन, पतिपत्नींमधील क्षुल्लक बाबींवरील कलह, नाना देशांतून आलेल्या जोडप्यांचा तीव्र जीवनकलह यांबद्दल मोकळेपणाने लेखिका बोलते. सारे जग जवळून पाहात आहोत, अनेकांची मने समजताहेत असे वाटू लागते. कुणी लेक्चरर अध्यापन सोडून तंबाखूची नोकरी करते. कुणी भारतीय डॉक्टर घरीही राबराब राबणे मुकाट मान्य करते ('आपल्या बायकांना सवय असते नाही याची?'). दरवर्षी भरणाऱ्या प्रसिद्ध अश्वशर्यतीला काळे दांपत्य एकदाही जात नाही हे त्यांचे वैशिष्ट्य जाणवते.

गेल्सबर्गला लेखिका दहा वर्षे राहते. तिथल्या बदलत्या निसर्गाची रंगरूपे तिने टिपली आहेत. 'हॉटलाइन' ह्या समाजसेवासंस्थेत तिला अनेकांच्या संसारातील दुःखांचे अनुभव येतात. काहींनी संततिनियमन केंद्र उघडले. त्यात लेखिका सामील झाली. त्या गावाबद्दल प्रमुख ब्रेंडा यांचे मत ती नमूद करते : "हे गाव एक नंबरच्या ढोंगी आणि पुराणमतवादी लोकांनी भरलेलं आहे. सच्छील असल्याचा आव लोक आणतात. इथं कुमारी माता आहेत, मुलं जन्माला घालून नाहीसे होणारे बाप आहेत. ड्रग्ज घेणारी मुलं आहेत."

तीन मुली झाल्यावर मुलगा व्हावा म्हणून तळमळणारे डॉ. चौधरी दांपत्यही तिथं लेखिकेला भेटते. एका डॉक्टरची पत्नी भारतात जाताना दारू, अत्तरे नेऊन विकून ट्रिपचा खर्च भागवी. पूजा करून मुलांवर संस्कार होतात असं काही भारतीय स्त्रिया मानतात. लेखिकेला सुंदर घरात, सुंदर चेहऱ्यामागे अनेक खोल दुःखं आढळली. कॅथलिक डॉक्टर कुटुंबनियोजनाच्या कामाबद्दल उघड नापसंती व्यक्त करीत.

आपण आणि आपला पती भारतीयांपासून कसे दुरावत चाललो तेही लेखिका मोकळेपणाने सांगते. "त्या दुरावण्याची खंत वाटेनाशी झाली होती. आपल्या विचारांशी जुळते-मिळते असलेले, आंधळेपणाने हिंदुत्वनिष्ठा आणि धार्मिक उपचारांचे पुनरुज्जीवन न करणारे, प्रामाणिक आणि स्वतःच्या क्षेत्रात चांगले काम करणारे भारतीय ह्या देशात मिळणं अवघड आहे हे जसजशी वर्षं जात होती तसतसं अधिकच प्रत्ययाला येत होतं." ही जाणीव आपणांस बेचैन करते.

प्रागतिक विचारांचा पुरस्कार करणारे नॉक्स कॉलेज

अनुक्रमणिका






तिला भेटले. अनेक सामाजिक विषयांवर तिथे परिसंवाद, भाषणे एवढेच नव्हे तर निषेध-मोर्चेही आयोजित केले जात. मुलींना संततिनियमनासाठी जायला कॉलेज टॅक्सीचे पैसे पुरवी. त्यांनी शिक्षण अर्धवट सोडणे कॉलेजला परवडण्यासारखं नसे, म्हणून.

संततिनियमनाच्या कार्याबद्दल तिला खूपदा कृतज्ञता मिळे आणि धन्य वाटे. पंचाऐंशी वर्षाची वृद्धाही तिचे कौतुक करी. जिला डेटिंग करताना मित्राचा काळा रंग खटकला नाही पण गरोदर झाल्यानंतर मिश्र मूल होऊ देणं अयोग्य वाटलं, अशी मुलगी लेखिकेला भेटते. तिला काळे-गोरे वर्णभेद अनेकदा जाणवतात. आता कुमारी माता उघडपणे स्वतःचे मूल वाढवू लागल्या आहेत, हे समाजपरिवर्तन लेखिका नोंदते.

लेखिका नवऱ्याला न घेता कॉलेजच्या काही मुला-मुलींबरोबर रशियाला जाते. "भारतात इतक्या वर्षांनंतरही धड छप्पर, अंगभर कपडा, दोनदा जेवण सर्वांना मिळत नाही, पण रशियात दिसते तशी भीती भारतात नाही. अमेरिकेतल्या इतकं नाही तरी स्वतःला काय वाटतं ते मांडण्याचं स्वातंत्र्य भारतात आहे." असे ती सहप्रवाशांना सांगते. रशियात बंदी असलेले पुस्तक कसे वाचतात? एक रशियन स्त्री सांगते : 'वरचं कव्हर फाडून चीप रोमान्सेसची कव्हरं आम्ही त्यावर चिकटवतो. ती भर्रकन वाचून पुढे सरकवतो. एकेक पुस्तक तीनशे ते चारशे लोक वाचतात!'

रशियात लेखिकेने काय पाहिले? हद्दपारी, उपासमारी, आणि राजकीय निष्ठांच्या निशाणाखाली उखडले गेलेले माणसांचे शेकडो समूह पाहिले. इजिप्त देशातील पिरॅमिड, पुनर्वसन केलेली देवळे, स्फिन्क्स, म्युझियम इत्यादींची माहिती देताना लेखिका खलिफांच्या घोर क्रौर्याच्याही आठवणी सांगते. ते खलीफ कलांचे प्रेमी तसेच निर्घृण होते हा विरोध कुणालाही सुन्न करणारा, गोंधळात टाकणारा आहे. इजिप्त आणि भारत यांतील एक साम्य ती नोंदवते : "साम्राज्यशाही, पारतंत्र्य आणि ब्रिटिशांनी केलेली पिळवणूक. मात्र भारतात स्त्री-मुक्तीची, नव्या जाणिवांची चळवळ आहे तशी धर्माचे वर्चस्व असलेल्या इजिप्तमध्ये राहाणे कठीण आहे" असे लेखिकेला वाटते. तिन्ही प्रवासवृत्तांत इतिहास, अन्य माहिती, सहप्रवासी, भारताशी असणारे साम्य वा विरोध या गोष्टींबरोबर मधूनमधून विनोदी भाष्ये आहेत; घरची, मराठी साहित्याची आठवणही आहे.

*आ.ना. पेडणेकर*





अनुक्रमणिका

